






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

९१

वर्ष २२ वें : अंक २ रा
जुलै-सप्टेंबर १९४९



संपादक :
यशवन्त दिनकर पेण्डरकर



अनुक्रमणिका

❀ महाराष्ट्र ❀
साहित्य–पत्रिका
वर्ष २२ वें : अंक २ रा
जुलै — सप्टेंबर १९४९



# पिकलें पान—

- उजाड उद्यान, भेगाळले वाफे माजल्या तणानें कोंदटलेले,
  पिवळीं शुष्क भंगूर पानें एकामागून गळतीं खालती.
  मूक रोदन ! परी ना त्यांची कुरकूर येते दिशांच्याही क़ानीं.
  वाहती उष्ण शिशिराचे वारे,
  प्रवासी मित्र थवे करून गेले दिगंतरा
  ठेवून मागे एकलकोंडा वृक्ष जुनाट;
  बसतो एकांतीं निश्चल स्तब्ध
  म्हणत मनाशीं, " हेंच नाहीं का जीवन–सार्थक ! "

- सायंकालाचे थकले भागले क्षीण किरण
  थरथरती, मूर्च्छित होती, होती अंतर्धान निमूटपणें.
  सैरावरा धांव घेतात विचार,
  मनाच्या देठापासून तुटून
  गळून फडफडत उडती, नाचती
  गिरक्या घेत वाऱ्यावर स्वैर बराच वेळ !
  ( पिवळया जर्द पानांचा अजून
  जाईना कसा हिरवटपणा ताठरपणा ? )

- वेलीवरती लोंब्रकळत दुधाणीच्या म्हातारीसंगे
  पाठशिवणी खेळ खेळत
  उतरणीवर घरंगळत, फिरक्या घेत,
  धांवतीं पानें. दमतां अखेर
  निश्वास मंद टाकून, स्मित अर्धेच राहून
  होतात निश्चल पिकलीं पानें !

- सळसळत ढीग त्यांचा साठे—
  खांचखळगे बुजवायाला ?
  कृमिकीटकांचें रक्षण कराया ?
  कां चिरशांति अनुभवायाला
  निसर्ग–मातेच्या मऊ पाळण्यांत ?

अनुक्रमणिका

"खतच होणार ! "—होऊं दे होणार खत साऱ्या पानांचें.
खत – संजीवनि !
स्वच्छंदी माझे विचार, भावना
होऊं दे त्यांचें खत – संजीवनी !
त्यांतच आहे आतां समाधान
भावना-पर्णे देतील आशा, उत्साहवर्धक नवजीवन
शिणल्या भागल्या उदास जीवांना, भावी पिढ्यांना.
हळव्या मनाच्या फसव्या कल्पना करीत स्वतांशीं
अखेर मानून घेतों समाधान !

—श्रीधर बाळकृष्ण रानडे

## अडखळे—

अडखळे लिहितांना
हात कधीं अवचित
आणि निरखून डोळे
पहातात अक्षरांत !

काना – वेलांटीचा डौल
मोड तशी अक्षराची
कधीं याची कधीं नाहीं
रेघ अक्षरावरची !

नकळत उमटली
कुणाची ही – काय तऱ्हा !
इवल्याशा रेघेमाजी
भावजीवनाचा झरा !

नव्हेतच अक्षरें हीं—
स्मृतिसुमनांचे झेले
एका एका अक्षरांत
भावगंध दरवळे !

म्हणूनच लिहितांना—
अवचित थांबे हात
धुकें तसें आंसवांचें
उभे राही लोचनांत !

—इन्दिरा.

# छंदःशास्त्र—
## वैदिक आणि लौकिक

लेखक—
य. ग. फफे

( २ )

वैदिक छंदांचें वास्तविक स्वरूप कशा प्रकारचें आहे आणि ऋचांतील छंदत्व वृद्धिंगत करून त्या छंदोगानास अधिक अनुकूल कशा केल्या जात असाव्या याचें दिग्दर्शन या लेखाच्या पूर्वार्धात झालें आहे. आतां याच वैदिक छंदांची परिणति होऊन त्यांपासूनच लौकिक वाङ्मयांतील वृत्तें व जाति यांची निर्मिति कशी झाली असावी आणि वृत्तांचें नामकरणही वैदिक ऋचांतील शब्दांच्या आधारेंच कसें केलें असावें हें पहावयाचें आहे.

वैदिक छंद हे संपूर्ण ऋचेंतील केवळ अक्षरसंख्येवरून ठरविले आहेत हें मागें सांगितलें आहेच. पण केवळ विशिष्ट अक्षरसंख्या असल्यानेच कांही छंदत्व येत नाही. तें येण्यास आणखी कांही गोष्टी असाव्या लागतात. गायत्री छंदांत २४ अक्षरें असावीं ही प्राथमिक अट होय. त्यांत तीन पाद असावे आणि ते आठ आठ अक्षरांचे म्हणजे समान लांबीचे असावे या अटी पुढे येतातच. पण एवढ्यानेहि खरें छंदत्व येत नाही. आपण हा छंद ऐकत आहों असें प्रतीत होण्यास त्याच्या पादांमध्ये कांही ध्वनिसाम्यहि ऐकूं यावें लागतें. म्हणजे त्यांच्या लगावलींत कांही साम्य असावें लागतें व तें नकळत कां होईना पण छंदांत उतरलेलें असतेंच. ऋग्वेदांतील पहिलीच ऋचा पहाः—

अग्निमीळे पुरोहितम् । यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् ।
S  S I S I S  S  S I S I S  S  S I S I S

या तिन्ही पादांतील सहा सहा अक्षरांखाली लघुगुरुचिन्हें केलीं आहेत तीं समान आहेत म्हणजे या ऋचेच्या तिन्ही पादांत ¾ लगावली समान उतरली आहे असें दिसून येईल. लगावलींत असें साम्य आहे म्हणूनच येथे छंदत्व प्रतीत होतें. या तिन्ही पादांच्या उत्तरार्धाची लगावली I S I S याच स्वरूपाची आहे. आज आपण ज्यास अनुष्टुभ् म्हणतों त्यांतील समपादांच्या उत्तरार्धांतहि अशीच लगावली असते. वैदिक गायत्री छंदांत ती प्रायः सर्वच पादांच्या उत्तरार्धांत असते हा विशेष होय. आतां आणखी कांही गायत्री छंद पाहूं. मं. १–३–७

ओमासश्चर्षणीधृतो ।
S S S S I S I S
विश्वे देवास आ गत ।
S S S S I S I S
दाश्वांसो दाशुषः सुतम् ॥
S S S S I S I S

या ऋचेंत तिन्ही पादांची लगावली समरूप आहे म्हणून यांत अधिक छंदत्व आहे हें स्पष्ट आहे.

मं. १–६–३ केतुं कृण्वन्नकेतवे । पेशो मर्या अपेशसे ।
SS SS I S I S  S S S S I S I S

या दोन्ही पादांतही वरलीच लगावली असून समान लगावलीमुळें हे पाद सुश्राव्य झाले आहेत.

मं. १-८४-१ असावि सोम इन्द्र ते । शविष्ठ धृष्णवा गहि ॥
मं. १-१०-३ अथा न इन्द्र सोमपा । गिरामुपाश्रुतिं चर ॥
मं. १-५०-३ अदृश्रमस्य केतवो । वि रश्मयो जनाँ अनु ॥
मं. १-९२-१८-३ उपर्बुधो वहन्तु सोमपीतये ।
मं. १०-२५-३-३ अधा पितेव सूनवे वि वो मदे ।
मं. ९-९३-३ तमस्य मर्जयामसि । मदो य इन्द्रपातमः ॥

या सर्व प्रमाणिका आहेत. छंदोगानास त्या विशेष अनुकूल आहेत हें सांगणें नकोच.

मं. १-११-५ त्वं वलस्य गोमतो अपावरद्रिवो बिलम् ।

ही समानिका आहे.

मं. १०-१३२-६ युवोर्हि माता अदितिर्विचेतसा ।
दियौर्न भूमिः पयसा पिपूतनि ॥

हें एक वंशस्थावृत्ताचें अर्ध आहे. अशीं वृत्तार्धे ऋग्वेदांत बरींच आढळतात. पुढील ऋचेंत 'रथमृताय' याचे जागीं 'रथं ऋताय' असा पदच्छेद करून म्हटल्यास वंशस्थावृत्त उत्तम जमतें. पहा:—

मं. १-३४-१० युवोर्हि पूर्वं सवितोषसो रथम् ।
ऋताय चित्रं घृतवन्तमिष्यति ॥

पुढील ऋचेंत 'वरेण्यः' याचे जागी इयादिपूरणाने 'वरेणियः' असें म्हटल्यास हें सुंदर वंशस्था—इन्द्रवज्रा अर्धसमवृत्त जमतें. पहा:—

मं. १०-९१-१ सं जागृवद्भिर्जरमाण इध्यते ।
दमे दमूना इषयन्निळस्पदे ।
विश्वस्य होता हविषो वरेणियः ।
विभुर्विभावा सुषखा सखीयते ॥

ऋग्वेदांत विविध वृत्तांचे पाद व वृत्तार्धे सर्वत्र विखुरलेलीं आहेत. उदाहरणादाखल पुढील पाद पहा:—

| | | |
|---|---|---|
| मं. ६-२२-५ | तं पृच्छन्ती वज्रहस्तं रथेष्ठाम् | शालिनी |
| | इन्द्रं वेपी वक्वरी यस्य नू गीः | ,, |
| मं. ६-२७-८ | अभ्यावर्ती चायमानो ददाति | ,, |
| | दूणाशेयं दक्षिणा पार्थिवानाम् | ,, |
| मं. ६-१३-६ | विश्वा द्युम्ना वृष्णया मानुषाणाम् | ,, |
| | अस्मभ्यं दा हरिवो मादयध्यै | वातोर्मि |
| मं. ६-६९-२ | या विश्वासां जनितारा मतीनाम् | ,, |
| | इन्द्राविष्णू कलशा सोमधाना | ,, |
| मं. ६-२१-४ | कस्ते यज्ञो मनसे शं वराय | ,, |
| मं. ६-४१-२ | या ते काकुत् सुकृता या वरिष्ठा | ,, |

| | | |
|---|---|---|
| मं. १ सूक्त ३२ | वृषायमाणो अवृणीत सोमम् | उपेंद्रवज्रा |
| | अपादहस्तो अपृतन्यदिन्द्र | ,, |
| | नदं न भिन्नं अमुया शयानं | ,, |
| | मनो रुहाणा अति यंति आपः | ,, |
| | अरान् न नेमिः परि ता बभूव | ,, |
| मं. १ सूक्त ३३ | इन्द्रं नमस्यन्नुपमेभिरर्कैः | इन्द्रवज्रा |
| | वज्रेण शत्रुं अवधीः पृतन्युम् | ,, |
| मं. १ सूक्त ३२ | चोतापरीभ्यो मघवा विजिग्ये | ,, |
| | श्येनो न भीतो अतरो रजांसि | ,, |
| मं. १–५५–३ | त्वं तामिन्द्र पर्वतं न भोजसे | श्येनी |
| मं. १–५७–६ | त्वं तामिन्द्र पर्वतं महामुरुं | ,, |
| मं. १-१०७-१-२ | आदित्यासो भवता मृळयन्तः | दोधक |
| मं. १–८८–६ | एषा स्या वो मरुतो अनुभर्त्री | ,, |
| मं. २–१–१० | त्वं विभासि अनु दक्षि दानवे | रथोद्धता |
| | त्वं इळा शतहिमासि दक्षसे | ,, |
| मं. २-११-१३ | स्याम ते त इन्द्र ये त ऊती | मयूरसारिणी |
| मं. १-६१-१६ | ऐषु विश्वपेशसं धियं धाः | ,, |

अशीं विविध वृत्तांचीं हवीं तेवढीं उदाहरणें देतां येतील. अशा प्रकारच्या सुस्वर चालींवर म्हणतां येण्याजोग्या या वैदिक ऋचा मनाशीं गुणगुणत असतां त्यांतील विशिष्ट चाली मनांत भरून त्या चालींवर नवीन पद्यें रचण्याकडे प्रवृत्ति होणें अगदीं स्वाभाविक आहे. लौकिक पद्यवाङ्मयाचा उगम असाच वैदिक ऋचांच्या अनुकरणाने झालेला असणार यांत संदेह नाहीं. या लौकिक पद्यांचे छंद सहजच ठाकठीक असणार व म्हणून ते **वृत्त** या संज्ञेस पात्र होणार हें ओघानेच घडणारें आहे. अशा प्रकारें वैदिक छंदांपासूनच विविध वृत्तें परिणत झालीं असलीं पाहिजेत हें उघड आहे. याप्रमाणें बरीच लौकिक पद्यनिर्मिति झाल्यानंतर तींतील निरनिराळ्या वृत्तांचें नामकरण करण्याची कल्पना निघाली असेल तेव्हां त्या वृत्तांशीं चालीने सदृश अशा ऋचांच्या पादांकडे दृष्टि वळणें व त्यांतीलच एकाद्या प्रमुख शब्दावरून त्या वृत्तांचें नामकरण करण्याची कल्पना सुचणें अगदीं स्वाभाविक आहे. अशाच वेळीं,

मं. ६–४७–८ इन्द्रस्य वज्रो मरुतामनीकम्
मित्रस्य गर्भो वरुणस्य नाभिः ।

हें ऋचेचें अर्ध दृष्टीपुढे घेऊन त्याशीं सदृश असलेल्या वृत्ताला **इन्द्रस्य वज्रः** या शब्दांच्या अनुरोधाने **इन्द्रवज्रा** असें नांव देण्यांत आलें असावें. या वृत्ताला इन्द्रवज्रा हेंच नांव देण्यांत आणीकहि औचित्य आहे तें असें:—

( १ ) हें इन्द्रवज्रा वृत्त म्हणजे त्रिष्टुभाचा एक पोटप्रकार होय आणि त्रिष्टुभ् छंदाची देवता इन्द्र ही आहे.

( २ ) इन्द्राने वज्राच्या साहाय्यानें केलेल्या पराक्रमाचें रसभरित वर्णन वेदांत प्रायः त्रिष्टुभ् छंदांत केलेलें आहे. आणि त्यामुळेच

( ३ ) इन्द्र आणि वज्र हे शब्द त्या वर्णनांत पुष्कळदा आलेले असून ते इंद्रवज्रा वृत्तांतहि आलेले आहेत. तसेंच

(४) ज्या सूक्तांत इन्द्रवज्रेच्या पादांत हे इन्द्र व वज्र शब्द आले आहेत त्या सूक्तांची देवताहि इन्द्र हीच आहे.

यावरून या वृत्ताला इन्द्रवज्रा हें नांव देण्यांतील यथोचितता ध्यानीं येईल.

इन्द्रवज्रा हें नामकरण करण्यांत आल्यानंतर असें ध्यानांत आलें असेल कीं इन्द्रवज्रेंतील प्रथमाक्षर गुरु असतें तेथे लघु अक्षर इतकाच भेद असलेले अकरा अक्षरी पादहि ऋग्वेदांत शेकडों आलेले असून त्यांच्या अनुकरणाने तसलेच चारी पाद असलेलीं पद्येंहि लौकिक वाङ्मयांत निर्माण झालेलीं आहेत. यांस नांव काय द्यावें याचा विचार निघाला असेल तेव्हा ही जवळजवळ इन्द्रवज्राच आहे हें ध्यानीं घेऊन हिला **उपेंद्रवज्रा** म्हणण्याची कल्पना सुचावी हें अगदीं स्वाभाविक आहे.

इन्द्रवज्रेंतच अन्त्याक्षरापूर्वी एक लघु अक्षर अधिक घातल्यानें जें बारा अक्षरी वृत्त तयार होतें त्याचे पाद वेदांत शेकडों आलेले आहेत. या वृत्तास कोणतें नांव द्यावें हा प्रश्न मूळ उद्भवला असेल तेव्हा

इन्द्राय वज्रं निघानिघ्नते वधम् । मं० १--५५--५
इन्द्रस्य वज्रः श्नथिता हिरण्ययः । मं० १--५७--२
इन्द्रस्य वज्रो वपुषो वपुष्टरः । मं० ९--७७--१
इन्द्रस्य वज्रं हविषा रथं यज । मं० ६--४७--२७

यांसारखे ऋचांचे पाद दृष्टीपुढे यावे, त्यांत प्रारंभींच इन्द्र हा शब्द दिसावा, या पादांचें इन्द्रवज्रेशीं असलेलें सादृश्य प्रतीत व्हावें आणि त्यास अनुसरून इन्द्रवज्रेच्या जातीची--इन्द्रवज्रेच्या वंशांतली--हें सूचित करणारें **इन्द्रवंशा** हें नांव त्या वृत्ताला ठेवण्याची कल्पना सुचावी हें स्वाभाविकच म्हणतां येईल.

इन्द्रवंशेंतील प्रथमाक्षर गुरु असतें तेथें लघु अक्षर एवढाच भेद असलेलेंही एक वृत्त ऋचांतील तत्सदृश पादांस अनुसरूनच लौकिक वाङ्मयांत येऊं लागलें. तेव्हा त्यास "इंद्रवंशेच्याच वंशांतलें" हें दर्शविणारें **वंशस्था** असें नांव देण्यांत आलें हें उचितच घडलें, हें कोणीहि मान्य करील. तथापि इंद्रवज्रा आणि उपेंद्रवज्रा यांचा जो संबंध आहे तोच तंतोतंत इन्द्रवंशा व वंशस्था यांचा असल्यामुळे वंशस्था या नांवाऐवजीं **उपेंद्रवंशा** असें नांव दिलें गेलें असतें तर तें अधिक समर्पक झालें असतें यांत शंका नाही.

वरील विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं, १ इंद्रवज्रा, २ उपेंद्रवज्रा, ३ इंद्रवंशा व ४ वंशस्था हीं वृत्तनामें वेदांत नसलीं तरी त्यांचे पाद व अर्धें त्यांत विपुल आहेत. तसेंच हीं नांवें ठेवण्याची कल्पना ज्यांवरून स्वाभाविकपणेंच सुचावी असे इन्द्र व वज्र हे सूचक शब्दहि त्या पादांत एकमेकांसन्निध व पादारंभींच आलेले पुष्कळ स्थळीं आहेत. तेव्हा या इन्द्रवज्रादि वृत्तनामांचा उगम अशा वेदमंत्रांतूनच झाला आहे असें निश्चित म्हणतां येतें.

आतां पुढील ओळी पहा:—

मं. १–३–८ विश्वे देवासो अप्तुरः सुतमा गन्... ( इत्यादि )
SS SSS SIS IIS S
मं. १--३--९ विश्वे देवासो अस्रिधः एहिमायाः... ( इत्यादि )
SS SSS SIS SISS

या दोन्ही ऋचा त्रिपदा गायत्रीच्या म्हणजे चोवीस अक्षरी छंदाच्या आहेत. त्यांतील आपल्या कामापुरतीं पूर्वार्धें म्हणजे बारा बारा अक्षरें येथें लिहून त्यांखालीं लघुगुरुदर्शक चिन्हें

केली आहेत. यांपैकीं नवव्या ऋचेंत 'अग्निधएहि' असा संधि होता त्या स्थळीं 'अग्निधः एहि' असा विसंधि केला आहे. या ओळीची लगावली तंतोतंत वैश्वदेवी वृत्ताची आहे असें दिसून येईल. आठव्या ऋचेंतील पूर्वार्धाची लगावली वर लिहिली आहे ती पाहतां तींतील नववें अक्षर लघु आहे एवढेंच ती लगावली वैश्वदेवीची होण्यास न्यून आहे. बाकी अकरा अक्षरांची लगावली वैश्वदेवी वृत्ताचीच आहे. छंदोगानाचे वेळीं हें नववें अक्षर गुरु उच्चारून वैश्वदेवीची चाल सहज जमवून घेतां येण्याजोगी आहे. दुसरें, या दोन्ही ऋचांत विश्वेदेव हा शब्द आला आहे व दोहोंतहि तो प्रारंभींच आला आहे. तिसरें, या ऋचांची देवता विश्वेदेव हीच आहे आणि चौथें, विश्वेदेव ही देवता ऋग्वेदांत या सूक्तांतच प्रथम आलेली असून तेथेंच ह्या ऋचा आहेत. यावरून सरळ अनुमान होतें कीं जेव्हां ऽऽऽऽऽऽ।ऽऽ।ऽऽ या लगावलीच्या वृत्ताची निर्मिति होऊन त्यास कोणतें नांव द्यावें असा प्रश्न उपस्थित झाला असेल तेव्हां या लगावलीशीं सदृश अशा उपर्युक्त ऋचांच्या ओळी दृष्टीपुढें आल्या असतील आणि त्यांच्या प्रारंभींचा विश्वेदेव हा शब्द व त्या ऋचांची विश्वेदेव ही देवता दृष्टींत भरून त्यास अनुसरून ह्या वृत्तास वैश्वदेवी असें नांव देण्यांत आलें असेल. वैश्वदेवी या वृत्त-नामाची ही उपपत्ति तर्कशुद्ध असून याहून समर्पक अशी दुसरी उपपत्ति पुढें येई तोंवर तरी ही मान्य होईल असा भरंवसा वाटतो.

आता वातोर्मि हें वृत्तनाम कसें पडलें असेल याचा शोध घेऊं. ऋग्वेदांत वातो-र्मीचे पाद विपुल आहेत. कित्येक स्थळीं या वृत्ताचीं अर्धेंहि सलग आलेलीं आहेत. यांच्या अनुकरणाने लौकिक वाङ्मयांत जें चतुष्पाद वृत्त परिणत झालें त्यास कोणतें नांव द्यावें असा प्रश्न उपस्थित झाला असेल तेव्हा याच लगावलीच्या वैदिक पादांकडे दृष्टि वळली असेल. व त्यांतील एकाद्या पादांतील विशिष्ट शब्दावरून किंवा त्यांतील विषयावरून या वृत्तास वातोर्मि हें नांव दिलें गेलें असेल असें साहजिक अनुमान होतें व त्यास अनुसरून पुढील पादाकडे दृष्टि जाते.

मं. १-९५-१०-१ धन्वन्स्रोतः कृणुते गातुमूर्मिम् ।

ऽऽ ऽऽ ।।ऽ ऽ।ऽऽ

अग्नि अंतरिक्षांत प्रवाह उत्पन्न करितो व त्याच्या ऊर्मींनी पृथ्वी व्यापून टाकितो, असें वर्णन या ऋचेंत आलें आहे. अंतरिक्षांत उत्पन्न झालेल्या प्रवाहाच्या या ऊर्मि म्हणजे वातोर्मि होत असें मनांत घेऊन आणि पादान्तीं असलेल्या ऊर्मि शब्दाकडे दृष्टि देऊन या पादाच्या लगावलीच्या वृत्ताला वातोर्मि हें नांव दिलें गेलें असावें.

वैदिक छंदांपासून परिणत झालेल्या लौकिक वृत्तांचें नामकरण कसें झालें असावें याचें दिग्दर्शन वरील विवेचनावरून होईल. याच प्रकारें आणखी कांही वृत्तनामांचा उगम वैदिक ऋचांतील शब्दांत सांपडणें शक्य असलें तरी तें पुष्कळ वृत्तनामांच्या बाबतींत शक्य नाही. हेंहि ध्यानीं घेतलें पाहिजे. ऋग्वेदांत बारा अक्षरांहून मोठे पाद प्रायः नाहीत हें मागें सांगितलें आहेच. तेव्हां लौकिक वाङ्मयांत बारांहून अधिक अक्षरी पादांचीं वसंततिलका, मालिनी, पृथ्वी, हरिणी, स्रग्धरा इत्यादि जीं वृत्तें आहेत त्यांचे पाद वेदांत सांपडणें शक्यच नाहीं. तीं वृत्तें पिंगलाने लौकिक वाङ्मयांतलीं म्हणूनच दिलीं आहेत. त्याने अथ लौकिकम् असें म्हणून लौकिक वाङ्मयांतील वृत्तांचें छंदःशास्त्र स्वतंत्रपणें लिहिलें आहे. यावरून त्याचे पुढें तोंवर झालेलें काव्यें, नाटकें, लोकगीतें इत्यादि प्रकारचें, भरपूर पद्यवाङ्मय असलें पाहिजे हें उघड आहे. याच वाङ्मयांतील कांही शब्दांच्या आधारानें

या दीर्घ वृत्तांचें नामकरण झालेलें असणार. पण आज तें पिंगलपूर्व लौकिक पद्यवाङ्मय उपलब्ध नाही म्हणून या वृत्तनामांचा उगम सांपडणें अशक्य वाटतें. बारा अक्षरांपर्यंतच्या पिंगलोक्त वृत्तनामांपैकींच कांहींचा शोध वैदिक वाङ्मयांत लागला तर लागणार. पण या नावांतहि तनुमध्या, द्रुतविलंबित, प्रमिताक्षरा यांसारखीं कित्येक नांवें त्या त्या वृत्तांतलेंच कांही लक्षण सांगणारीं आहेत तीं नांवें ऋग्वेदांत सांपडणें अशक्य वाटतें. तसेंच कुमारललिता, नवमालिनी, शालिनी इत्यादि नांवें ऋग्वेदीय दिसत नाहीत. अशीं नांवें वगळलीं तर जीं ऋग्वेदांत सांपडूं शकतील अशीं वृत्तनामें मोजकींच उरतील.

ऋग्वेदामध्ये असे कित्येक पाद आढळतात कीं, त्यांच्यासारखी रचना केली तर तीं सुश्राव्य वृत्तें होतील. अशा वृत्तांस त्या वैदिक पादांतील शब्दांवरून समर्पक नांवेंहि देतां येतील. उदाहरणार्थः—

मं. १--१४०--१ वेदिषदे प्रियधामाय सुद्युते ।
ऽ।।ऽ ।।ऽऽ। ऽ।ऽ
धासिमिव प्रभरा योनिमग्नये ।
ऽ।।ऽ ।।ऽ ऽ।ऽ।ऽ

हे दोन्ही पाद एकाच लगावलीचे आहेत म्हणजे हें एक द्वादशाक्षरी वृत्त आहे. यास या ऋचेतील शब्दास अनुसरून **प्रियधाम** किंवा **प्रभरा** असें नांव देणें युक्त होईल.

मं. ७--२--८ आ भारती भारतीभिः सजोषा ।
ऽ ऽ।ऽ ऽ।ऽऽ ।ऽऽ
मं. ६--७५--१८ मर्माणि ते वर्मणा छादयामि ।

हे दोन्ही पाद समान लगावलीचे आहेत. या लगावलीचे पुष्कळ पाद ऋग्वेदांत आढळतात. या वृत्ताला **भारती** म्हणणें समर्पक होईल.

मं. ६--७५--१ जीमूतस्येव भवति प्रतीकम् ।
ऽऽऽऽ। ।।ऽ ।ऽऽ
यद्वर्मी याति समदा मुपस्थे ॥

या प्रकारच्या वृत्ताला **प्रतीक** असें नांव देतां येईल.

वैदिक छंदांपासून लौकिक वृत्तें कशीं परिणत झालीं, त्या वृत्तांचें नामकरणही वैदिक ऋचांच्या आधारेंच कसें करण्यांत आलें आहे आणि वेदांतील पादांच्या अनुकरणानें आणीकहि अनेक सुमधुर वृत्तें निर्माण होणें कसें शक्य आहे हें येथवर थोडक्यांत पाहिलें. आता इतर छंदःप्रकारांस वैदिक आधार मिळतो की काय याचा शोध घेऊं.

वैदिक छंदांप्रमाणेंच मराठींतहि लघुगुरुत्वाचा विचार न करितां केवळ अक्षरसंख्येवर आधारलेले कित्येक छंद आहेत. सर्व प्रकारचे अभंग, घनाक्षरी, व कांहीं प्रकारच्या ओव्या यांचा यांत समावेश होतो. यांचें वैदिक छंदांशीं इतकें साम्य आहे की, यांच्या रूढ नांवांऐवजीं वैदिक छंदांचीं नांवें दिलीं तरी साजतील. पहाः—

(१) धन्य तोची प्राणी । क्षमा ज्याचे अंगीं ।
न भंगे प्रसंगीं । धैर्यबळ ॥ १ ॥

या प्रकारचे अभंगांत ६ + ६ + ६ + ४ = २२ अक्षरें असावीं एवढीच अट आहे. म्हणून हा **विराड् गायत्री** छंद होय.

( २ ) हेंचि दान देगा देवा । तुझा वीसर न व्हावा ।
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥

अशा प्रकारचे अभंगांत प्रतिपादांत ८ अक्षरें असतात. म्हणून अशा चार पादां-मिळून होणाऱ्या अभंगास अनुष्टुभ् म्हणतां येईल.

( ३ ) बाळ जातो दूर देशा । मन गेलें वेडावून ।
आज सकाळपासून ॥

या प्रकारच्या आधुनिक ओव्यांत अष्टाक्षरी तीन पाद असतात. हा **त्रिपदा गायत्री** छंद होय.

( ४ ) बुडतां आवरीं । मज भवाचे सागरीं ॥
नका मानूं भार । पाहों दोषांचे डोंगर ॥ १ ॥
आहे तें सांभाळीं । तुझी कैशी ब्रीदावळी ॥
तुका म्हणे दोषी । मी तों पातकांची राशि ॥ २ ॥

यांतील विषम पादांत सहा व सम पादांत आठ अक्षरें असतात. अशा प्रकारच्या चार पादांत २८ अक्षरें होतात म्हणून यास उष्णिक् म्हणतां येईल.

( ५ ) घनाक्षरीच्या चार कडव्यांतील प्रत्येकांत अष्टाक्षरी चार पाद असतात म्हणून प्रत्येक कडवें म्हणजे अनुष्टुभ्च होय.

अशा प्रकारें मराठींतील या छंदांचें वैदिक छंदांशीं कसें साम्य आहे तें आपण पाहिलें. आतां तिसरा छंदःप्रकार म्हणजे **जाति**, याचें मूळ ऋग्वेदांत सांपडतें कीं नाहीं याचा शोध घेऊं. जो पद्यप्रकार अक्षरसंख्येवर अवलंबून नसून मात्रांवर अवलंबून असतो त्यास **जाति** असें म्हणतात. ( जातिर्मात्राकृता भवेत् ). मराठींत अनेक कविकृत विपुल व विविध पदसंग्रह आहे. हीं पदें म्हणजे **जाति** होत. पदांत अनेक कडवीं असतात. प्रत्येक कडव्यांत प्रारंभीं समान लांबीचे कांहीं पाद व अंतीं **ध्रुवपद** असतें. मध्यंतरीं एक वा अनेक पादांचा **अंतरा** कांहीं पदप्रकारांत असतो तर कांहींत नसतो. प्रथम दोन पाद व त्यांपुढें ध्रुवपद अशा तीन पादांचें कडवें असणें हा अगदीं साधा जातिप्रकार होय. यांतील पहिल्या कडव्याचा जो पहिला पाद तेंच ध्रुवपद असतें म्हणून पहिल्या कडव्यांत पहिला व तिसरा पाद एकच असतो. पुढील कडव्यांत मात्र दोन पादांपुढें तो ध्रुवपदाचा तिसरा पाद येतो. अशा प्रकारच्या रचनेचा उगम ऋग्वेदांत आढळतो. पहा:—

मं. ९ सूक्त ५८ —

तरत् स मंदी धावति ।
धारा सुतस्य अंधसः ।
तरत् स मंदी धावति ॥ ध्रुवपद ॥ १ ॥
उस्रा वेद वसूनाम् ॥
मर्तस्य देवी अवसः । तरत् स० ॥ २ ॥
ध्वस्रयोः पुरुषंतीयोः ।
आ सहस्राणि दद्महे । तरत् स० ॥ ३ ॥
आ ययोस्त्रिंशतं तना ।
सहस्राणि च दद्महे । तरत् स० ॥ ४ ॥

हें सूक्त म्हणजे चार कडव्यांचें एक पदच होय असें दिसून येईल. कोणी अशी शंका घेईल कीं, या सूक्तांतील पालुपद हें ध्रुवपदासारखें असलें तरी या सूक्ताचा छंद त्रिपदा गायत्री हा अक्षरसंख्येवर अवलंबून आहे, यास जाति कसें म्हणतां येईल. जातींत मात्रांची संख्या विवक्षित असावी लागते, अक्षरांची नव्हे. या शंकेच्या निवारणासाठी वरील सर्व पादांतील मात्रा मोजून पहाव्या. 'तरत् स मंदी धावति' या पादांत १३ मात्रा आहेत. तशाच

|S | SS S|S

त्या प्रायः सर्व पादांत आहेत. एकाच पादांत एक मात्रा कमी पडते पण छंदोगानाचे वेळीं तो पादहि जमवून घेतां येतोच. मराठी पदांत तर असा जमवून घेण्याचा प्रकार पुष्कळच करावा लागतो. आता असेंच दुसरें एक सूक्त घेऊं.

मं. १–सूक्त ९७.

अप नः शोशुचद् अघम् । अग्ने शुशुग्धि आ रयिम् । अप नः ...॥ १ ॥
सुक्षेत्रिया सुगातिया । वसूया च यजामहे । अप नः ...॥ २ ॥
प्र यद् भंदिष्ठ एषाम् । प्रास्माकासश्च सूरयः । अप नः ...॥ ३ ॥
प्र यत् ते अग्ने सूरयो । जायेमहि प्र ते वयम् । अप नः ...॥ ४ ॥

याच स्वरूपाचीं आणखी चार पद्यें या सूक्तांत आहेत. म्हणून हें सूक्त म्हणजे आठ कडव्यांचें पदच होय. हीं दोन्हीं सूक्तें गायत्री छंदाचीं असल्यामुळें यांत दोन पादांपुढें ध्रुवपद आलें आहे. मं. १ सूक्त १०६ व १०८ हीं अनुक्रमें चतुष्पाद त्रिष्टुप् व जगती छंदांत असल्यामुळे यांतील पालुपद किंवा ध्रुवपद दर तीन पादांपुढे येतें. मं. १ सूक्त ८० व १०५ हीं पंक्ति छंदांत असल्यामुळे त्यांतील ध्रुवपदामागे चार चार पाद आहेत. बृहती छंदाच्या चार पादांपैकीं ३ अष्टाक्षरी व एक द्वादशाक्षरी असल्यामुळे या छंदाच्या सूक्तांत अंतरा येतो असेंहि म्हणतां येईल. अशा प्रकारें विविध जातिप्रकारांचेंहि मूळ वैदिक वाङ्मयांत आढळतें असें दिसून येतें. विस्तारभयास्तव अधिक उदाहरणें घेण्याचे भरीस न पडतां, वरील विवेचन सर्वसामान्य कल्पना येण्यास पुरेसें आहे असें समजून येथेंच समारोप करणें उचित होईल.

लेखाच्या या उत्तरार्धांतील निर्गत असें:—

१ लौकिक वाङ्मयांतील बारा अक्षरी व त्यांहून कमी अक्षरी अशा पुष्कळ वृत्तांचे शेंकडों पाद ऋग्वेदांत आढळतात.

२ या पादांच्या अनुकरणानेच सुव्यवस्थित लौकिक वृत्तें निर्माण झालीं.

३ या वृत्तांपैकीं कित्येकांचें नामकरणहि ऋचांतील विशिष्ट शब्दांवरूनच केलें असावें असें दिसून येतें.

४ वृत्तांप्रमाणेंच अभंगादि प्राकृत छंदांचेंहि वैदिक छंदांशी पूर्ण साम्य आहे. इतकेंच नव्हे तर

५ जाति ह्या नवीन समजल्या जाणाऱ्या पद्यप्रकाराचेंहि मूळ ऋग्वेदांत आढळून येतें.

---

## जुन्यापुराण्यांचा हा वाडा—

जुन्यापुराण्यांचा हा वाडा जुनापुराणा झाला
जुन्यापुराण्या इतिहासाला मिळुन जाउं द्या त्याला !
पहाच याच्या अष्टांगाला आला तिरका झोक
खचल्या भिंताडास निघाला अहो केवढा पोक !

ताटकळुन या तुळईचे तर मोडलेंच कंबरडें
बिजागरावर दार खरडतां फोडी जणु हंबरडें !
जपुन चढा हा जिना—तयाला भरे कांपरें भारी
वाटे यासह कोसळेल ही डुलती दुनिया सारी !

या खिडक्यांच्या लालजांभळ्या फुटून गेल्या कांचा
आता या नुसत्याच राहिल्या जणु डोळ्यांच्या खांचा !
भोकाळ्या भिंतीला पडलीं भेदक हीं खिंडारें
त्यांतुन शिरतां गुरगुर सुरसुर करितें भिरभिर वारें

पोचटून साराच गिलावा गळून पडला खालीं
विवर्ण मळक्या विचक विटांतुन लपून बसल्या पाली
पोपड्यास चिकटून राहिला उरलासुरला रंग
या रंगाने बेरंगाचा अधिकच हो बेढंग !

ढासळलेल्या ढिपळांची ही जागोजागीं रास
मोडकळीची, वैराणाची जिथे तिथे आरास
पायापासुन सुटला अगदीं या डोलाचा तोल
काय तयाला शिमिटचुन्यानें डकवण करता फोल ?

सांभाळुन का धराल ? कुठवर आवराल हो याला ?
कवणेपरि थोपवाल धप्धप् ढळत्या कोसळत्याला ?
दूर सारुनी जीर्णजुन्याच्या सडक्यापडक्या लोभा
या धरतीवर उभारूं चला कांहि नवोज्ज्वल शोभा !

नवे अम्ही नवनिर्माणाची करूं नवीं नवलाई
अमुच्या नवदृष्टीला दिसुं द्या नवेंच सारें कांही !
नवसंयोजन, नवरचनाही, नवेच कारागीर
नव्या दिशेला सन्मुख करितो नवाच अमुचा धीर

पराक्रमाची छिनी, आणखी पुरुषार्थाची करणी—
हातीं घेउन नवे गवंडी करूंच कौतुककरणी !
जुन्यापुराण्या मोडकळीचा नकोच कांही नाद
आम्ही नवशिल्पाचे धाते घडवुं नवा प्रासाद !

—राजकवि काळेले.

———

# अध्यात्माला शृंगाराची पुरवणी

लेखक :
प्रा. रामचंद्र शंकर वाळिंबे,
एम्. ए.

या जगांत प्रत्येक मानवाच्या मनांत विवेकाचा अंकुर रुजावा, वाटेल त्याला ब्रह्मविद्येचा लाभ घडावा, सर्वांच्या डोळ्यांना परमात्मतत्त्वाचें दर्शन घडावें, किंबहुना साऱ्या विश्वांत ब्रह्मज्ञानाचा सुकाळ व्हावा याच एका इच्छेनें प्रेरित होऊन ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी रचिली ( ज्ञा. १३. ११६०–२ ). अध्यात्मविद्येचें प्रतिपादन करीत असल्यापुळे ज्ञानेश्वरांनीं केवळ तर्ककठोर विवेचनपद्धतीचा आश्रय घेतला असता तर ते स्वाभाविकच झालें असतें. परंतु अध्यात्माचें प्रवचनहि रसाळ आणि अत्यंत आकर्षक करून दाखवितां येतें हें त्यांनी सिद्ध केलें आहे. इतकेंच नव्हे तर रसाळपणाची रेलचेल करणें ही त्यांची प्रतिज्ञाच आहे. ज्ञानेश्वरांच्या ठायीं जी रसिकता पुरेपूर भरली आहे तिची प्रतीति या आध्यात्मिक प्रबंधांत अनेक ठिकाणीं येईल. संवेदनांचें तत्त्वज्ञान प्रमाण मानणारा एखादा आधुनिक कवि ज्या तन्मयतेने मानवी विकारांचें वर्णन करील त्याच तन्मयतेने ज्ञानेश्वरांनीहि अत्यंत रसिकतेने असें वर्णन प्रसंग मिळेल त्या ठिकाणीं केलें आहे. अध्यात्म विद्येवर ज्ञानेश्वर प्रवचन करीत आहेत हें लक्षांत घेतलें असतां पदोपदीं त्यांच्या रसिकतेचा जो साक्षात्कार होतो तो खरोखर अलौकिकच मानला पाहिजे. स्त्रीपुरुषांचें आत्मिक व शृंगारिक प्रेम, लंपट पुरुषाची अनावर भोगासक्ति, निष्प्रेम जीवन कंठून चवचाल प्रेमाचा बाजार मांडणारी पण्यांगना, प्रियकराशीं ' तनुमनजीवें ' करून समरस होणारी पतिव्रता, केवळ उत्तान शारीरिक प्रेम, इत्यादि अनेक ' प्रेमाच्या जाती ' ज्ञानेश्वरांनी मोठ्या रसाळपणाने वर्णिलेल्या आहेत. या प्रांतांत ज्ञानेश्वरांनी जें जाणतेपण दाखविलें आहे तें विचारांत घेतलें असतां या विशीच्या आंतील ब्रह्मचारी तरुणाला इतकी किमया कशी साधली याचें नवल वाटल्यावाचून राहत नाहीं.

## गुरु हा प्रियकर, भक्त ही प्रेयसी

कांहीं अध्यायांच्या प्रारंभीं जीं नमनें आहेत त्यांत ज्ञानेश्वरांनी मुक्त कंठाने आपल्या गुरुदेवतेची स्तुति गायिलेली आहे. गुरूशीं पूर्णपणें समरस झालेल्या व त्याला सर्वस्व अर्पण करणाऱ्या भक्ताचें गुरुशीं कोणतें नातें असतें किंवा असावें याविषयी निरनिराळ्या कल्पना प्रचलित असूं शकतील. गुरु व शिष्य यांच्यामधील तादात्म्याला केवळ प्रियकर व प्रेयसी यांच्यामधील समरसतेचीच उपमा साजेल असें ज्ञानेश्वरांना वाटतें. भक्ताची बुद्धि ही प्रिया व गुरु हा प्रियकर ही कल्पना पुढील ओवींत स्पष्टपणें आली आहे–

नातरी जीवाचिये सेजे । गुरु कांतु करूनि भुंजे ।
ऐसी प्रेमाचिनि भोजें । बुद्धी वाहे ॥ १३.३९१

बाराव्या अध्यायांत भक्ताचें व आपलें नातें सांगतांना भगवान म्हणतात—

अर्जुना तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु ।
तो वल्लभा मी कांतु । ऐसा पाढिये ॥ १२.१५६

अनन्य योगाने परमेश्वराची भक्ति करणाऱ्या भक्ताचें वर्णन करीत असतां पुनश्च हा वल्लभ आणि कांता यांचा दृष्टांत आला आहे. वल्लभाकडे जातांना कांतेला ज्या-

प्रमाणें कसलाहि संकोच वाटत नाहीं त्याप्रमाणें परमेश्वराकडे जातांना खऱ्या भक्ताला संकोच वाटत नाहीं.

रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं सांकडें ।
तिये कांतेचेनि पाडें । एकसरला जो ॥ १३.६०७

परमेश्वर हा प्रियकर व भक्त ही प्रेयसी ही कल्पना बाराव्या अध्यायांत आणखी एकदा आली आहे.

तैसे ते माझें । कलत्र हें जाणिजे ।
काय्सिनिही न लजें । तयांचेनि मी ॥ १२.८६

श्रीकृष्ण पूर्णपणें अर्जुनाच्या कह्यांत गेले होते हें सांगतांना कामुक व अंगना यांचा दाखला ज्ञानेश्वरांनी दिला आहे.

परि पांचांहीआंतु अर्जुना । श्रीकृष्ण सावियाचि झाला अधीना
कामुक कां जैसा अंगना । आपैता कीजे ॥ ११.१६९

याच प्रकारची कल्पना अठराव्या अध्यायांत पुनः आली आहे. कामुक स्त्री आपल्या वल्लभाकडे ज्याप्रमाणे आवडीने पाहते त्याचप्रमाणें अर्जुनाने संतांकडे पहावें असें श्रीकृष्ण म्हणत आहेत.

आत्मज्ञानें चोखडीं । संत जे माझी रूपडीं ।
तेथ दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ॥ १८.१३५६

या उपमेला 'अश्लीलतेचा वास विनाकारण' लागला आहे असे श्री. तात्यासाहेब केळकर म्हणतात हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. (' ज्ञानेश्वरीसर्वस्व '–पृ. २९५ ). परमेश्वर हा प्रियकर आणि भक्त म्हणजे प्रेयसी असा नात्याचा संबंध साक्षात्कारी संतांच्या काव्यांत अनेक ठिकाणीं दिसून येतो. आपल्याच संतांच्या बाबतींत हें खरें आहे असें नसून खिस्ती साक्षात्कारी संतांच्या व संतिणींच्या बाबतींतहि तें खरें आहे. गुरु व भक्त यांचा अन्योन्य-संबंध कोणत्या प्रकारचा असतो हें रामदासी संप्रदायांतील एका प्रसिद्ध भाक्तिणीच्या पुढील वचनावरून दिसून येईल.

श्रीमुखचंद्र पहातां लवती या पापण्या न सोसवती ।
स्वसुखें स्वपतिशिं रमतां त्यासमयीं अन्य हे नसो सवती ॥

परमेश्वर हा प्रियकर व भक्त ही प्रेयसी असें मानल्यावर स्वाभाविकच भावनेचा उद्रेक झाला म्हणजे परमेश्वररूपी प्रियकराला दृढ आलिंगन द्यावें असें भक्तरूपी प्रेयसीला वाटणारच. विश्वरूपदर्शनाने स्तिमित झालेला अर्जुन भावनेच्या भरांत परमेश्वराला म्हणतो—

परी आतां ऐसी चाड जीवीं । जे तुजसी गोठी करावी ।
जवळीक हे भोगावी । आलिंगावासी ॥ ११.५९०

याठिकाणीं परमेश्वराला आलिंगन द्यावें अशी भक्ताला अभिलाषा झाली आहे; परंतु अठराव्या अध्यायांत परमेश्वरानेच भक्ताला कडकडून मिठी मारल्याचा सोहळा वर्णिला आहे. " आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो " ॥ (१८.१४१८). आलिंगन दिल्याबरोबर परमेश्वर व भक्त यांमधील द्वैत नष्ट न होतांहि भक्त परमात्मस्वरूप झाला.

दीपें दीपु लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला ।
द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ॥ १८.१४२२

आणि परिणाम असा झाला कीं अर्जुन महासुखांत निमग्न झाला, किंबहुना त्या सुखाची अनावर ऊर्मि दोघांनाहि सहन होईना—

तेव्हां सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया ।
तेथ वाडु तऱ्हीं बुडोनियां । ठेला देवो ॥ १८.१४२३
तैसे तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें । १८. १४२५

गुरु आणि भक्त यांचा संबंध अशा प्रकारचा असल्यानंतर गुरुराज पराप्रकृतिरूपी तरुणीशीं विलास करतात ( 'परापरमप्रमदाविलासिया' —१०. १ ) आणि नुकतेंच तारुण्यांत पदार्पण करणाऱ्या तुर्यावस्थेचें कोडकौतुक करतात ( 'तरुणतरतुर्यालालनलीला'—१०. २ ) असें ज्ञानेश्वरांनी स्तवनाच्या भरांत गुरुमाउलीचें प्रेमळपणाने वर्णन केलें तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें काय आहे ? चौदाव्या अध्यायांत तर शुद्धविद्यारूपी वधूचे प्रियकर असें गुरुमहाराजांचें वर्णन केलें आहे ( 'विशदविद्यावधूवल्लभ'—१४.३ ).

गुरुशीं अनन्यभावाने समरस झालेल्या भक्ताला गुरूच्या मीलनाची कशी अनावर उत्कंठा लागते याचें तेराव्या अध्यायांत जें वर्णन आलें आहे तें प्रियकराच्या वाटेकडे डोळे लावून बसलेल्या विरहार्त कामिनीच्या मनोविकारांच्या वर्णनासारखेंच वाटेल—

गुरुगृह जये देशीं । तो देशचि वसे मानसीं ।
विरहिणी कां जैसी । वल्लभातें ॥ १३.३७५
तियेकडोनि येतरे वारा । देखोनि धांवे सामोरा ।
आड पडे म्हणे घरा । बीजें कीजो ॥ १३.३७६

पहिल्या ओवींत विरहिणी आणि वल्लभ यांचा स्पष्ट उल्लेख असून दुसऱ्या ओवींतील वर्णनाने कालिदासाच्या ' मेघदूतांतील ' मेघाला सामोरा जाणाऱ्या यक्षाची कांहींना आठवण होईल.

येथे हें लक्षांत ठेविलें पाहिजे की, ईश्वर व भक्त अथवा गुरु व भक्त यांमधील नातें प्रियकर-प्रेयसीप्रमाणें असतें असें ज्ञानेश्वरांनी अनेक ठिकाणीं स्पष्टपणें म्हटलेलें असलें तरी भक्त हें अपत्य व परमेश्वर ही माता ही कल्पनाहि त्यांनी एका ठिकाणीं मांडलेली आहे. उदाहरणार्थ,

हें रूप दाखवणें देवराया । कीं मज अपत्या चुकलिया ।
बुझावोनि तुवां माया । स्तनपान दिधलें ॥ ११.६६८

वल्लभकांतेचें हें रूपक निराळ्या प्रकरणींहि आलेलें आहे. चौदाव्या अध्यायांत आविद्या ' ही परमेश्वराची कांता आहे असें म्हटलें आहे.

तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी ।
अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥ १४.८७

अठराव्या अध्यायांत गीता ही प्रिया व परमात्मा हा प्रियकर अशी कल्पना आली आहे.—

कीं निजकांता आत्मया । आवडी गीता मिळावया ।
श्लोक नव्हती, बाह्या— । पसरु कां जो ॥ १८.१६७३

जीव हा चिंतेचा प्रियकर ही कल्पना सोळाव्या अध्यायांत आली आहे—

ते भोगपटाची मवणी । जीवीं अनियम चिंतवणी ।
जे सांडू नेणे मरणीं । वल्लभा जैसी ॥ १६.३३२

## कामिनी आणि कांत

परमेश्वर–भक्त किंवा गुरु–भक्त यांच्याविषयींच्या रूपकात्मक भावेचा विचार बाजूस ठेवून आपण लौकिक व्यवहारांत प्रवेश केला म्हणजे ज्ञानेश्वरांची मुसमुसलेली रसिकता ठायीं ठायीं प्रकट होतांना दिसेल. या रसिकतेने अनेक रूपें धारण केली आहेत हें मात्र विसरतां कामा नये.

महासागराची भेट झाल्यावरोबर खळाळ वाहणारी गंगा शांत होते त्याप्रमाणें प्रियकराची भेट झाल्यावर कांता शांत होते ही मोठी आकर्षक कल्पना अठराव्या अध्यायांत आली आहे—

घडतां महोदधीसीं । गंगा वेगु सांडी जैसी ।
कां कामिनी कांतापासीं । स्थिर होय ॥ १८.१०८१

प्रियकराच्या दर्शनाने दृष्टीची तृप्ति होते असा उल्लेख सोळाव्या अध्यायांत आला आहे.

डोळेयां प्रियाची भेटी । कां पिलियां कूर्मीची दिटी ॥ १६.१७०

पत्नी आपल्या पतीकडे मर्यादशीलपणें जाते ही कल्पना सतराव्या अध्यायांत आली आहे.

मग तयावां ठाईं चित्ता । निवर्तवावी स्वसत्ता ।
परि प्रियापुढें कांता । रिगे जैसी ॥ १७.२७५

आपले माहेर सोडून कामिनी प्रियकरास अनुसरते आणि तसाच प्रसंग आला तर प्रियकरासाठीं ती सासरचेंहि सोर पाश तोडून टाकते हें स्त्रीच्या त्यागमय जीविताचें वर्णन ज्ञानेश्वरांनी पुढीलप्रमाणें केलें आहे—

सांडूनि कुळें दोन्ही । प्रियासी अनुसरे कामिनी । १८.१०१३

## स्त्रीचें आत्मसमर्पण

स्त्रीचें आत्मार्पण ( Self-abnegation ) किती परिपूर्ण असते याचें पुढील वर्णन पहावें—

नाना वेंटाळूनि जीवितें । गुणागुण उखितें ।
प्राणनाथा उचितें । दिधलें प्रिया ॥ १३. ३७३.

प्रियकरावर मनोभावानें प्रेम करणारी स्त्री आपले पंचप्राण गोळा करून ते साऱ्या गुणावगुणांसह प्रियकराला अर्पण करते या ज्ञानेश्वरांच्या कल्पनेशीं एलिझबेथ बॅरट ब्राउनिंगच्या The Ways of Love या प्रसिद्ध सॅनेटची तुलना जरूर करावी.

—I love thee with the breath,
Smiles, tears, of all my life–

या मिसेस् ब्राउनिंगच्या ओळींत व ज्ञानेश्वरांच्या कल्पनेंत फारसा फरक नाहीं.

परंतु याहिपेक्षा अधिक मनोज्ञ कल्पना अठराव्या अध्यायांत आली आहे. ज्याला पंचप्राण अर्पण केले आहेत अशा प्रियकराची फारा दिवसांनी भेट झाल्यावर बरेच दिवस आवरून ठेवलेली दुःखें आणि दडपून टाकलेल्या भावना त्याच्याजवळ केव्हा प्रकट करूं अशी उत्कंठा प्रेयसीला लागते याचें पुढील आकर्षक वर्णन पहावें—

कां उखितें आंगेंजीवें । आपणपें दिधलें जियां मनोभावें ।
तिया कांतु मिनलिया न राहवे । हृदय जेवीं ॥ ११. ५७७

प्रेयसीच्या मनःस्थितीचें ज्ञानेश्वरांनी केलेलें हें वर्णन वाचतांच मला ॲलाइम् मेनेलच्या I run, I run, I am gathered to thy heart या ओळीची आठवण झाली.

प्रेयसीने प्रियकराला, अथवा प्रियकरानें प्रेयसीला दिलेल्या आलिंगनाचा उल्लेख ज्ञानेश्वरांनी पांचसहा ठिकाणीं केला आहे. पुढील ओवींत पतिव्रता आपण होऊन प्रियकराला आलिंगन देते असें वर्णन आहे—

तरी स्वाधिकाराचेनि मार्गें । आलें जें मानिलें आंगें ।
पतिव्रतेचेनि परिष्वंगें । प्रियातें जैसें ॥ १८. ५८६

हा ओवी वाचतांच 'तूं आपण होऊन मला कधीं आलिंगन दिलें नाहींस' ही गडकऱ्यांच्या वृंदावनानें कालिंदीजवळ केलेली नाजुक तक्रार (पुण्यप्रभाव, अंक १ प्रवेश २) मला आठवली.

## प्रिय व्यक्तीला आलिंगन

स्वप्नांत प्रेयसीला किंवा प्रियकराला आलिंगन देतां येते ही गोष्ट ज्ञानेश्वरांना चांगली माहीत असली पाहिजे याची प्रतीति पुढील दोन ओव्यांतून मिळेल—

स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेवऊनी वेगीं ।
आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकामु करी ॥ १५. ८६
तेथ स्वप्नींचिया प्रिया । चेवोनि झोंवों गेलिया ।
ठाथिजे दोन्ही न होनियां । आपणचि जैसें ॥ १८. ११५८

दुसरी ओवी वाचतांच 'मामाकाशप्रणिहितभुजं निर्दयाश्लेषहेतोर्लब्धायास्ते कथमपि चिरात् स्वप्नसन्दर्शनेषु' या कालिदासाच्या मेघदूतांतील ओळींची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं.

अज्ञानी मनुष्य गोतावळ्यांत गुरफटून राहतो आणि घरादाराला अगदी घट्ट धरून राहतो हें स्पष्ट करण्यासाठीं एखादी कामिनी गळामिठी मारून आपल्या प्रियकराला घट्ट धरून राहते या आशयाचा पुढील दृष्टांत दिला आहे—

प्रियोत्तमाचिया कंठीं । प्रमदा घे आटी ।
तैशी जीवेंसी कोंपटी । धरूनि ठाके ॥ १३.७८६

## आलिंगनांतील अद्वैत

ज्ञानी पुरुष आत्मसुखाचा अनुभव घेत असतां तन्मयता त्यांना गाढ आलिंगन देते. या आलिंगनाचें ज्ञानेश्वरांनी जें वर्णन केलें आहे ते प्रेमी युगलाच्या आलिंगनाच्या वर्णनापेक्षा मुळीच निराळें नाहीं—

तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कवळी ।
तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥ ५.१३३
कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाप लोपे ।
तैसें सुखाचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ॥ ५.१३४

अनुक्रमणिका

प्रणयी जीवांचें अद्वैत, खरें तादात्म्य म्हणतात तें हेंच ! प्रियतमेशीं पूर्णपणें समरस होण्याच्या इच्छेनें तळमळणाऱ्या प्रियकराच्या मनःस्थितीचें रॉबर्ट ब्राउनिंगनें केलेलें पुढील वर्णन वरील ओव्यांशीं ताडून पाहण्यासारखें आहे—

I would I could adopt your will,
See with your eyes, and set my heart
Beating by yours, and drinking my fill
At your soul's springs,—your part my part
In life, for good and ill,.

## अंगनेचें उन्मादक सौंदर्य

अंगनेच्या उन्मादक सौंदर्याची ज्ञानेश्वरांना चांगलीच कल्पना होती. पुढील ओळी पहा—

कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।
प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ १.४२

महाभारतांत प्रतिक्षणीं जें नावीन्य प्रकट होतें त्याला कामिनीच्या सौंदर्याच्या नव्हाळीचा दाखला येथें दिला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. गीतातत्त्व प्रतिक्षणीं नवीन भासतें हें सांगत असतां आणखी असाच दृष्टांत आला आहे. 'प्रतिक्षणं यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः' या प्रसिद्ध वचनाचा साक्षात्कार पुढील ओवींत झाल्याविना राहणार नाहीं.

तेथ हर म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें ।
तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ॥ १.७२

स्त्रियांच्या मूळच्या सौंदर्याला शोभा कशानें प्राप्त होते हेंहि ज्ञानेश्वरांना अवगत आहे. प्रमदेच्या गहिऱ्या डोळ्यांना काजळानें जें मादकपण येतें तें ज्ञानेश्वरांच्या नजरेतून सुटलेलें नाहीं—

सांवळ्या आंगा चंदन । प्रमदालोचनां अंजन ।
तैसें अधिकारासी मंडण । नित्यपणें जें ॥ १८.५८७

कामिनीच्या कटाक्षांतील चांचल्य व सौंदर्य यांचें वर्णन करणारी पुढील ओवी पहावी. वासनांच्या अधीन झालेल्या जीवांची लगबग कशी चालू असते याचें हें वर्णन आहे.

काय चंचळु नाना । कामिनीकटाक्षु कायसा ।
लवलाहो तैसा । विजूही नाहीं ॥ १४.१७०

स्वातीच्या पाण्यानें मोतीं निर्माण झालीं नसतीं तर 'प्रथमवयसाकाळीं' तारुण्याच्या नव्हाळीमध्यें असलेल्या अंगनांच्या अंगावर खुलून दिसण्याचें भाग्य त्यांना कसें लाधलें असतें असा मार्मिक प्रश्न पुढील ओवींत विचारला आहे—

स्वातीचिनि पाणियें । न होती जरी मोतियें ।
तरी अंगीं सुंदराचिये । का शोभती तियें ॥ १८.१७००

तरुणी तारुण्याचा उपभोग घेते असा उल्लेख अठराव्या अध्यायांत आलेला आहे—

यालागीं तो कर्मयोगी । मी जालाचि मातें भोगी ।
तारुण्य कां तरुणांगी । जियापरी ॥ १८.११४७

[ या ओवींतील ' तरुणांगी ' या शब्दाचा अर्थ श्री. बा. अ. भिडे यांनीं ' तरुण पुरुष ' असा केला आहे. परंतु हा शब्द तेराव्या अध्यायांत येऊन गेला असून तेथें त्याचा अर्थ ' तरुण स्त्री ' हाच आहे यांत कसलांच शंका नाहीं.

का पतिपुत्रांतें आलिंगी । एकचि ते तरुणांगी ।
तेय पुत्रभावाच्या आंगीं । न रिगे कामु ॥ १३.४८१; १५ ८६ पहा. ]

## उद्यानांत प्रियेचा सहवास

हीं सर्व उदाहरणें ज्ञानेश्वरांच्या रसिकतेचीं द्योतक असलीं तरी त्यांची जातिवंत रसिकता यांत प्रकट झालेली नाही. आधुनिक काळचा एखादा संवेदनावादी कवि मानवी जीविताचें कृतार्थत्व ज्या प्रकारें वर्णील अथवा एखादा मुरलेला शृंगारवादी संस्कृत कवि ज्याप्रकारें जीविताचें सार वर्णील नेमक्या त्याच प्रकारानें ज्ञानेश्वरांनी पुढील बहारीचें वर्णन केलें आहे—

आणि ऋतु बरवा शारदु । शारदीं पुढती चांदु ।
चंद्रीं जेसा संबंधु । पूर्णिमेचा ॥ १८.३४४
का वसंतीं बरवा आरामु । आरामीं प्रियासंगमु ।
संगमीं आगमु । उपचारांचा ॥ १८.३४५

हें ' सार ' अलंकाराचें उदाहरण आहे हें ज्ञात्यांना सांगणें नकोच. अध्यात्मविद्येचें प्रवचन करून परतत्त्वाचा उपदेश करणाऱ्या विरक्त पुरुषानें केलेलें हें वर्णन आहे हें एखाद्याला खरेंहि वाटावयाचें नाही. एखाद्याला तर उमर खय्यामची पुढील रुबाईहि कदाचित् आठवेल—

Here with a Loaf of Bread beneath the Bough
A Flask of Wine, a Book of Verse—and Thou
Beside me singing in the Wilderness—
And Wilderness is Paradise enow.

## सौंदर्याला नृत्यगीताची पुरवणी

उन्मादक लावण्य असावें, तारुण्याचा ऐन बहर असावा आणि तशांत नृत्यकौशल्य अंगीं ओतप्रोत असावें—आणि याच्या जोडीला कर्णमधुर संगीत सुरू व्हावें आणि फुलांचा व उटीचा कोमल सुवास सर्वत्र दरवळावा—मग सारें वातावरण धुंद आणि 'मदिर' झाल्यास काय नवल ? स्वैराचारी व विलासी पुरुषांच्या सुखभोगाचें हें धुंद वातावरण ज्ञानेश्वरांनी पुढीलप्रमाणें चितारलें आहे—

रूपा नृत्याची पुरवणी । ते पुढां डोळेभारणीं ।
गीत भाटींव तो श्रवणीं । कर्णजपु ॥ १७.२९७
तयाहीवरी अळुमाळु । जें घे फुलगंधाचा गुगुळु ।
तंव भ्रमाचा तो वेताळु । अवतरे तैसा ॥ १७.२९८

या ओव्यांतील वर्णन कालिदासाच्या मेघदूतांतील ' नीचैस् ' पर्वताच्या गुहांमध्ये रात्रीं उन्मत्त विलासासाठीं जमलेल्या पण्यांगना व त्यांचें सौंदर्य लुटणारे अनिर्बंध व स्वैर भोगलोलुप पुरुष यांच्या क्रीडेच्या पुढील वर्णनाची आठवण करून देणारें आहे—

यः पण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिर्नागराणा—
मुद्दामानि प्रथयति शिलावेश्मभिर्यौवनानि ॥

## कुलवधूची शालीनता

तरुण व शालीन कुलवधूच्या लाजण्याचें व तिच्या भावनांचें ज्ञानेश्वरांनी पुढील-प्रमाणें उत्कृष्ट वर्णन केलें आहे—

जैसें न सांगणेवरी । बाळा पतीसी रूप करी ।
बोल निमालेपणें विदरी । अचर्चातें ॥ १५. ४६८

निरनिराळीं नांवें उच्चारण्यास सांगितलीं असतां, आपल्या पतीचें नांव येतांच लाजेने चूर झालेली अभिजनवती तरुणी तें नांव न उच्चारतांच केवळ आपल्या लाजण्यानेंच 'हें आपल्या पतीचें नांव आहे' असें सुचविते—हा वरील ओवीचा भावार्थ आहे. स्त्रीच्या भावनांचें इतकें आकर्षक वर्णन करणारा मनुष्य खरा मार्मिक व रसिक असला पाहिजे.

शालीन कुलवधूचें वर्णन आणखी एकदोन ठिकाणीं आलें आहे. तारुण्यांत आलेली मर्यादशील स्त्री आपले उठावदार अवयव इतरांच्या नजरेस पडूं नयेत याविषयी कशी जपत असते याचें वर्णन पुढील ओवींत आढळेल—

आढय आतुडे आडवीं । मग आढयता जेविं हारवी ।
नातरि कुलवधू लपवी । अवेवांतें ॥ १३. २०६

आत्मज्ञानाची सिद्धि ज्याला प्राप्त झालेली आहे असा मनुष्य निद्रा व आलस्य या विकारांना मुळींच थारा देत नाही हें स्पष्ट करीत असतां ज्ञानेश्वरांनी कुलवधूचा दृष्टांत दिला आहे. पतीशिवाय अन्य पुरुषाने कामुकतेचें प्रदर्शन केलें असतां कुलवधु तिकडे संपूर्ण दुर्लक्ष करते असें या दृष्टांताचें तात्पर्य आहे—

आणि परपुरुषें कामिली । कुलवधू आंग न घाली ।
निद्रालस्या न मोकली । आसन तैसें ॥ १८. १०२७

## गरोदर स्त्री

कुलवधु आपलें शीलरक्षण मोठ्या कौशल्याने करते. त्याचप्रमाणें गरोदर स्त्री हरप्रयत्नानें पतिशय्येला पाठ लावण्याचें चुकविते असा उल्लेख आहे.

माहेवणी प्रयत्नेंसीं । चुकविजे सेजे जैसी ।
रिपु पाटीं नेदिजे तैसी । समरंगणीं ॥ १८. ८६६

गरोदर स्त्री ( माहेवणी ) जी खबरदारी विशिष्ट प्रसंगीं घेत असते तिचें ज्ञानेश्वरांनी मिळविलेलें हें मार्मिक ज्ञान केवळ पुस्तकी व ऐकीवच काय ? कीं, हा ज्ञानाचा 'उन्मेष' उपजतच प्राप्त झाला असें समजावें ? योगभ्रष्ट पुरुषांच्या सामर्थ्याचें व सिद्धप्रज्ञेचें वर्णन करीत असतां ज्ञानेश्वर म्हणतात—

तैसी दशेची वाट न पाहता । वयसेचिया गांवा न येतां ।
बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ६. ४५३
तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनच सारस्वतें दुभे ।
मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥ ६. ४५४
आणि मागील जे सद्बुद्धि । जेथ जीवित्वा जाहाली होती अवधि ।
मग तेचि पुढती निरवधी । नवी लाहे ॥ ६. ४५७

सिद्ध पुरुषाला उपजतच ज्ञानाचा साक्षात्कार होतो आणि प्रौढ दशा प्राप्त होण्या-पूर्वीच त्याच्या अंगीं सर्वज्ञता संचारते; पक्व बुद्धीच्या प्राप्तीने त्याच्या तोंडून सर्व शास्त्रें

आपोआपच प्रकट होतात; आणि मागील जन्मीं ज्या मर्यादेपर्यंत त्याची प्रज्ञा पोंचली होती त्याच मर्यादेपासून या जन्मीं त्याला नवीन प्रज्ञा प्राप्त होते — असा वरील ओव्यांचा आशय आहे. ज्ञानेश्वरांनीं हें स्वतःचेंच वर्णन केलें असेल काय?

गर्भ आणि डोहाळे यांचा स्पष्ट उल्लेख सहाव्या अध्यायांत आला आहे (६.१४८-९).

## पतिव्रता कुलस्त्री

पतिव्रता कुलस्त्रीचे उल्लेख अनेक ठिकाणीं आले आहेत. स्वतःच्या पतीशिवाय इतर पुरुषाविषयीं वैषयिक प्रेमाचा प्रादुर्भाव कुलस्त्री आपल्या मनांत होऊं देत नाहीं असा भावार्थ पुढील ओव्यांतून आहे—

तरि एकु प्रियोत्तमु- । वांचोनि वाढों नेदी कामु ।
जैसा कां मनोधर्मु । पतिव्रतेचा ॥ १७. १७१

पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचूनि न स्पर्शे ।
मी सर्वस्व यां तैसें । सुभटांसी ॥ १. १११

अहेतुकें चित्तें । अनुष्ठां पां ययातें ।
पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ ३. ९२

पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता ।
अनायासें आत्महिता । भेटेचि ते ॥ १६.४५६

जी स्त्री स्वपतीवर अनन्य भावाने प्रेम करते व म्हणून पति जिची नेहमीं तारीफ करतो त्या पतिव्रतेची पतीपेक्षांहि अधिक स्तुति करावयास नको काय?

पाहा पां अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे ।
ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता ॥ ६. १२९

स्त्रियांच्या जातींत स्वाभाविक असणारे विलास पतिव्रतेच्या ठायींहि असतात; परंतु ते विलास वैषयिक प्रेमाला आणि हीन वासनांना चाळवीत नाहींत अशा अर्थाची एक ओवी तेराव्या अध्यायांत आहे.

नव्हती भोग सतियेचे । प्रेमभोग ॥ १३.४८७

पतिव्रता आपण होऊन पतीला आलिंगन देते हा उल्लेख मागें येऊन गेलाच आहे. (१८.५८६)

## घराबाहेर

स्वतःच्या घरांत पतीपासून होणाऱ्या जाचाला कंटाळून एखाद्या कुलस्त्रीने घराबाहेर पडावें आणि तिने 'दुसरा घरोबा' करावा; परंतु नव्या घरीं तिला पहिल्यापेक्षा जास्तच त्रास व्हावा—अशल्या या विचित्र परिस्थितींत सांपडण्यापेक्षा पहिलें घरच सोडलें नसतें तर फार बरें झालें असतें असें तिला वाटणें स्वाभाविक नव्हे काय? पुढील ओवी पहा—

कुलस्त्री दांडगाचे घाये । परघर रिगालीहि जरी साहे ।
तरी स्वपतीते वायें । सांडिलें कां ॥ १८.९४४

## धर्मपत्नी आणि वेश्या

व्यावहारिक शहाणपण ज्यांत भरपूर भरलेलें आहे असा पुढील मार्मिक दाखला पहा,

परि धर्मपत्नी धांगडी । पोसितां जरी एकी वोढी ।
तरि कां अपरवडी । आणावी आंगा ॥ १८.९४२

स्वतःची धर्मपत्नी गांवढळ, आचरट अथवा रासवट आहे या सबबीवर एखाद्या गुरुछचू माणसाला 'अंगवस्त्र' बाळगण्याची इच्छा होणें स्वाभाविक असलें तरी दुराचरणी बाहेरख्याली बाईला संभाळणें व आपल्या पत्नीचा प्रतिपाळ करणें या दोन्ही प्रकरणात पैशाची ओढाताण जर सारखीच असली तर अंगवस्त्र बाळगून बळेंच दुर्लौकिक अंगाला चिकटवून घेण्यांत काय मतलब आहे?

## स्वस्त्री कशीहि असली तरी ती चांगलीच!

'स्वधर्मे निधनं श्रेयः' या सिद्धांताला ज्ञानेश्वरांनीं पुढील दृष्टांत दिला आहे—

हें असो, वनिता आपुली। कुरुप जरी जाहली।
तरी भोगितां तेचि भली। जियापरी ॥ ३.२२४

या ओवींतील 'भोगितां' हा शब्द अनेकांना कर्णकटु वाटेल यांत शंका नाही. पण 'अपि स्वदेहात्किमुतेन्द्रियार्थाद्यशोधनानां हि यशो गरीयः' असें कालिदासानेंहि म्हटलें आहेच कीं!

## नवपुष्पावरील भ्रमर आणि तेजस्वी स्त्री

पुरुषाला नेहमी नावीन्य हवें असतें, तो नवपुष्पावरील भ्रमर असतो, हें श्री. माडखोलकर यांच्या अनेक कादंबऱ्यांतून प्रतीत होणारें सत्य ज्ञानेश्वरांनाहि थोडें फार माहीत असावें असें दिसतें. पुढील ओवी पहा—

**नवियें आवडीचेनि भरें। कामुक निजवनिता विसरे।**
मग पाडेंवीण अनुसरे। भ्रमला जैसा ॥ १.१८७

ही ओवी वाचून अनेकांना शाकुंतलांतील हंसपदिकेच्या 'अभिनवमधुलोलुपस्त्वम्' इत्यादि पदाची आठवण झाल्यावाचून राहणार नाहीं.

परंतु, पुरुष हा नवपुष्पावरील भ्रमर असतो हें खरें मानलें तरी रूपगुणांनी युक्त असलेली थोरामोठ्याच्या घरांतील स्त्री जर मानिनी आणि तेजस्वी असेल तर ती आपल्या नवऱ्याचें प्रेम हिरावून घेऊं पाहणाऱ्या उपऱ्या प्रेयसीच्या कर्तबगारीला पायबंद घालते हेंहि ज्ञानेश्वरांनीं सांगून टाकलें आहे—

जिया उत्तम कुळींचिया होती। आणि गुणलावण्य आथी।
तिया आणिकीतें न साहती। **सुतेजपणें** ॥ १. १८९

## अध्यात्मविद्येंत पण्यांगनांची हजेरी

ज्ञानेश्वरांच्या अध्यात्मविद्येच्या प्रवचनांत पण्यांगनांचीहि भरपूर हजेरी लागलेली आहे; आणि या अत्यंत नाजूक विषयांतहि ज्ञानेश्वरांनी सूक्ष्म अवलोकन व कमालीचा मार्मिकपणा या गोष्टींचा भरपूर आविष्कार केला आहे. वेश्या आपलें हरपणारें तारुण्य टिकविण्याची धडपड करते हा दाखला पुढील ओवींत आला आहे—

लडाणे आला पान्हा। पळवी जेवीं अर्जुना।
कां लपवी **पण्यांगना**। वडिलपण ॥ १३.२०५

याहिपेक्षां परिणामकारक वर्णन सतराव्या अध्यायांत आलें आहे. 'अंगहीन,' म्हणजे वयोमानामुळे सुरकुतलेली एखादी वेश्या आपलें सौंदर्य कायम आहे असा भास निर्माण करण्यासाठीं 'मेक-अप' करून कसा साजशृंगार करते याचें हें मार्मिक वर्णन पहा—

आंग बोल माखुनि तपें । विकावया आपणपें ।
**अंगहीन** पडपे । जियापरी ॥ १७.२४६

विषयी माणसाला वेश्या सौंदर्यवती वाटते परंतु, वस्तुस्थिति अशी आहे कीं वेश्येचा अंगस्पर्श झाला नाहीं तोपर्यंतच तिच्या लावण्याची शोभा पाहून घ्यावी.

संवचोरमैत्री चांग । जंव न पविजे तें दांग ।
**सामान्या** भली आंग । न शिवे तंव ॥ १८.२५० [सामान्या—वेश्या]

वेश्येची मैत्री वाटेंत भेटलेल्या ठगाच्या मैत्रीसारखी असते हीच कल्पना अठराव्या अध्यायांत आणखी एकदा आली आहे. या ठिकाणीं वेश्येचें 'हाटभेटीचें कलत्र' असें अत्यंत मार्मिक वर्णन केलें आहे.

संवचोराचें मैत्र । **हाटभेटीचें कलत्र** ।
कां लाघवियाचे चित्र । विनोद ते ॥ १८.७९७

हाटभेटीचें कलत्र म्हणजे बाजारबसवी—गावभवानी. अशा बाईचें बोलणें, लचकणें, मुरडणें, पाहणें—सारेंच मायावी आणि लाघवी. पुढील वर्णन पहा—

आणि मन जयाचे काळली । राहाटी कुडी चोरिली ।
दिठी कीर ते बोली । **पण्यांगनेची** ॥ १८.६७२

तेराव्या अध्यायांत ज्ञानेश्वरानी कोणत्याहि एका देवतेंत चित्त तन्मय न करतां दररोज नवीन देवता शोधून तिची वरकरणी दांभिक भक्ति करणाऱ्या लबाड भक्ताला 'स्वैरसंचार' करणाऱ्या भटक्या बाजारबसवीची उपमा दिली आहे.

ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी ।
अवधेन **गांवद्वारीं । अहेव** जैसी ॥ १३.८२२

गांवद्वारीं अहेव—गांवाच्या वेशीवर राहणारी सवाष्ण, बाजारसवाष्ण, बाजारबसवी.

[ या ओवींत वर्णिलेल्या लबाड भक्ताची नवऱ्याशीं वरकरणी चांगलें वागून जाराकडे जाण्यासाठी उतावीळ झालेल्या स्वैरिणी स्त्रीशींहि अन्यत्र तुलना केली आहे. नवऱ्याला आपल्या स्वैरसंचाराचा संशय येऊं नये यासाठीं जारिणी त्याच्याशीं बाह्यात्कारी अतिशय प्रेमळपणानें वागते. परंतु त्याची पाठ वळली नाही तोंच 'शिणगार' करून चौर्यरतासाठी घराबाहेर पडते.

ना तरी कांताच्या मानसीं । रिगोनि **स्वैरिणी** जैसी ।
राहाटे जारेंसीं । जावयालागीं ॥ १३.८०९ ]

वेश्या ही सर्वजनोपयोगी गोष्ट आहे ही कल्पना पुढील ओवींत आली आहे. वाण्याचें दुकान जर चुकून उघडें राहिलें तर ज्याप्रमाणें जाणारा येणारा कोणीहि आंत शिरून हाताला लागेल ती वस्तु लांबवावयास संकोच करीत नाही त्याप्रमाणे वेश्येच्या उन्मत्त तारुण्याचा उपभोग घेण्याच्या बाबतींत कोणासहि संकोच करण्याचें कारण नाहीं.

जैसें सत्रीं अन्न जालें । कां **सामान्या** बीक आलें ।
वाणसियेचें उभावलें । कोण न रिगे ॥ १३.७०१ [ बीक—तारुण्यतेज ]

ही ओवी वाचल्यावर मृच्छकटिक नाटकांतील पुढील ओळीची आठवण होणें अपरिहार्य आहे—

त्वं वापीव लतेव नौरिव जनं वेश्यासि सर्वं भज । ( मृच्छ० १.३२ )

यजमानाच्या आश्रयानें वेश्या खोटेंच सवाष्णपण मिरवते व इतरांना फसवते—

वल्लभाचिया उजरिया । आपणयाप्रति कुस्त्रिया ।
जोडोनि तोषिती जैसिया । अद्वैतपणें ॥ १६.३७७

वेश्येचे आणखी दोन दृष्टांत आढळतात. वेश्येनें एखाद्याला सर्वस्व दिलें म्हणजे हिचें आपल्यावर अनावर एकनिष्ठ प्रेम आहे या भोळया विचाराने तो परम संतोष पावतो. परंतु वेश्येने आपलें सर्वस्व देणें ( अथवा देण्याचें सोंग करणें ) म्हणजेच यजमानाचा संपूर्ण नाश हें माणसाच्या ध्यानांत येत नाही.

परि बापुडा ऐसें नेणें । जें वेश्येचें सर्वस्व देणें ।
तेंचि तें नागवणें । रूप एथ ॥ १३.७४५

याहिपेक्षां अधिक स्पष्ट ( आणि अत्यंत मार्मिक व सत्य ) वर्णन पुढील ओवींत आढळेल. गांठीं पुण्य असेपर्यंत स्वर्गांत राहण्याची सवलत ज्यांना मिळाली आहे अशा यज्ञ-याग करणाऱ्या दीक्षितांना पुण्यसंचय संपल्याबरोबर स्वर्गांत राहणें अशक्य होतें हें स्पष्ट करण्यासाठीं, वेश्येच्या घरीं जाऊन पैसे गमावलेल्या व म्हणून पुन्हा तिच्या दाराला बोट लावण्यासहि असमर्थ ठरलेल्या 'प्रेमिका'चा दृष्टांत दिला आहे—

वेश्याभोगीं कवडा वेचे । मग दारही चेपूं न ये तियेचें ।
तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगों ॥ ९.३२९

दीक्षिताचें वर्णन करीत असतां वेश्येचा दृष्टांत द्यावा की न द्यावा हा विचार बाजूला ठेवला तर प्रस्तुत दृष्टांत अत्यंत मार्मिक आहे हें कोणीहि 'रुहृदय' मान्य करील. कोणाला हा दृष्टांत अश्लीलहि वाटेल हेंहि मान्य करावयास पाहिजे. पण अध्यात्मविद्येचें विवेचन करीत असतांहि असला दृष्टांत देण्यास ज्ञानेश्वरांना संकोच वाटला नाही हें खरोखर चिन्त्य आहे.

आठव्या अध्यायात मानवी शरीर म्हणजे वारांगनेचा सोबती असून तें विषयोपभोगाचें साधन आहे असें वर्णन आलें आहे.

जें व्याघ्राचें क्षेत्र । जें पण्यांगनेचें मैत्र ।
जें विषयविज्ञानयंत्र । सुपूजित ॥ ८.१४६

## पूर्ण अश्लील उपमा

दीक्षितांना वेश्यागमनी माणसाची उपमा देण्यांत औचित्यभंग झालेला असला तरी या उपमेंत अश्लीलता आहे असें मला वाटत नाही. जिला खरीखुरी अश्लील उपमा म्हणतां येईल ( व जी ज्ञानेश्वरींत यावयास नको होती असें कोणीहि म्हणेल ) अशी एकच उपमा मला ज्ञानेश्वरींत आढळली. (माझें या बाबतींतलें ज्ञान असावें तितकें व्यापक नाही असें कोणा सज्जनाने दाखवून दिल्यास मी त्याचा खास उतराई होईन ). पूर्णपणें विषयवासनांत गुरफटून गेलेल्या अज्ञानी मनुष्याचें वर्णन चालू असतां ही उपमा आली आहे. उपमा अगदी समर्पक आहे असें मानलें तरी ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरींत तिचा वापर करावयास नको होता असें स्पष्टपणें म्हणावेसें वाटतें. प्रस्तुत ओळी उद्धृत करतांना लेखणी संकोचते हें खरें. परंत ज्ञानेश्वरांच्याच भाषेंत-बोलावयाचें तर मातंगसदन टाळावयाचें असेल तर ते कोणत व कसें आहे हें माहीत असणें जरूर असतें ( १८.५४८ ). या न्यायाने अश्लील टाळण्यासाठी तरी अश्लील म्हणजे काय तें माहीत असावयास पाहिजे. ओवी अशी आहे —

खरी टेको नेदी उडे । लातौनि फोडी नाकाडे ।
तऱ्ही जेवि न काढे । माघौता खरु ॥ १३.७०६

## सुरतक्रीडा

संभोग ( १४.८९; ४.१८७ ), कोकशास्त्र ( १३.८३१ ), सुरत ( ५.१३४, १५.७४ ) इत्यादींचे उल्लेख ज्ञानेश्वरींत आलेले आहेत. पुढील ओवी पहावी —

जो नाइकिजता नादु । जो असौरभ्य आनंदु ।
जो आंगाथिला आनंदु । सुरतेंविण ॥ १५.७४

## स्वैरिणी

स्वैरिणीचा दृष्टांत ज्ञानेश्वरींत निदान तीन ठिकाणीं आला आहे ( १३.५०६, १८.८०६, १३.८०९ ). स्वैरिणीच्या संगापासून होणाऱ्या सुखाचा उल्लेख पुढील ओवीत आहे—

आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें ।
स्वैरस्त्रीसंनिधानें । होय जें सुख ॥ १८.८०६

नवरा भोळा असला तर स्वैरिणीला स्वच्छंद विहार करावयास सापडतो, त्याला मोठ्या कौशल्याने फसवून ती जाराकडे जाते ( १३.८०९ ); परंतु नवरा जर प्रतापरावासारखा दांडगा असला तर असल्या चवचाल स्त्रीला तो डांबून ठेवून तिचें 'हिंडणें' बंद करूं शकतो. उदाहरणार्थ—

बाहेरी धीट जैसी । दाटुगा पति कळासी ।
करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसी ॥ १३.५०६ [ बाहेरी—बाहेरख्याली स्त्री ]

परंतु, दुर्दैवानें नवरा जर बाईलवेडा असला तर ती बाईल त्याचे पाणी जोखून असते; आणि मग अशा नवऱ्याला तिच्यापुढे हात टेकावे लागतात. पुढील ओवी पहा—

म्हणऊन गा पांडुसुता । जैसी सकामा न जिणवेचि वनिता ।
तेवि मायामय हे सरिता । न तरवे जीवां ॥ ७.९६

## विरक्त पुरुष आणि स्त्रीसौंदर्य

स्त्रीच्या सौंदर्याचा विरक्त पुरुषावरहि मोठा परिणाम होतो आणि तो तिच्या पाशांत जखडला जातो ही कल्पना पुढील ओवींत आलेली आहे—

तैसें प्रकृतिजालेपणें । पुरुषा गुण भोगणें ।
उदास अंतौरीगुणें । आतुडे जेवीं ॥ १३.१०१४ [ अंतौरी—स्त्री ]

## चार्वाकाचे वंशज

स्त्रीच्या सौंदर्याची महती ज्ञानेश्वरांनी ठिकठिकाणीं मान्य केली असली तरी उपभोगाने कामवासनेची तृप्ति न होतां ती उलट वाढतच जाते हें त्यांनी स्पष्ट केलें आहे. ' न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ ' या प्रसिद्ध श्लोकांतील आशय पुढील ओवींत दिसेल —

जैसा भोगीं कामु वाढे । कां इंधनें आगीसि हकाक चढे । ११.४३२

आणि चार्वाकपंथांतील अतिरिक्त सुखवाद्यांचा किंवा भोगवाद्यांचा ज्ञानेश्वरांना पूर्ण तिरस्कारच वाटत असला पाहिजे हें अनेक ओव्यांवरून स्पष्टपणें दिसून येतें. स्त्रीच्या केवळ शारीरिक प्रेमाची आसक्ति बाळगणाऱ्या भोगलंपट पुरुषाचें हें उत्कृष्ट वर्णन पहा —

स्त्रिया गाइलें आइकावें । स्त्रीरूप डोळां देखावें ।
सर्वेंद्रियें आलिंगावें । स्त्रियेतेंची ॥ १६.३३४
कुरवंडी कीजे अमृतें । ऐसें सुख स्त्रियेपरौतें ।
नाहींचि म्हणौनि चित्तें । निश्चयो केला ॥ १६.३३५

भोगलोलुप पुरुषाच्या मनावर वैषयिक अभिलाषेचें मोठें सुरस वर्णन तेराव्या अध्यायांत आलेलें आहे. ज्ञानेश्वरांचें अत्यंत सूक्ष्म व्यावहारिक अवलोकन या वर्णनांत पराकोटीला पोंचलें आहे. नमुन्यादाखल कांही ओव्या पहा—

साकरेचिया राशी । वैसली नुठे माशी ।
तैसेनि स्त्रीचित्त आवेशी । जयाचें मन ॥ १३.७८३
तेतुलेनि पाडें पार्था । घरीं जया प्रेमआस्था ।
आणि स्त्रीवांचूनि सर्वथा । जाणेना जो ॥ १३.७८९
तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडोनियां सर्वभावें ।
कोण मी काय करावें । कांहीं नेणें ॥ १३.७९०
हानि लाज न देखे । परापवादु नाइके ।
जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥ १३.७९२
चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेनि छंदें नाचे ।
माकड गारुडियाचें । जैसें होय ॥ १३.७९३
प्रेमाथिलेनि भक्तें । जैसेनि भाजिजे कुळदैवतें ।
तैसा एकाग्रचित्तें । स्त्री जो उपासी ॥ १३.७९८
साच आणि चोख । तें स्त्रियेसीचि अशेख ।
येरांविषयीं जोगावणूक । तेही नाहीं ॥ १३.७९९
इयेते हन कोणी देखैल । इयेसी वेखासें जाईल ।
तरी युगाचि बुडैल । ऐसें जया ॥ १३.८००

अगदी थोड्या शब्दांत यथातथ्य ( graphic ) वर्णन करण्याची ज्ञानेश्वरांची हातोटी वरील प्रत्येक ओवींत दिसून येईल.

याच अध्यायांत प्रकृतीचें जें वर्णन आलें आहे ते एखाद्या कामुक स्त्रीच्या हावभावांना तंतोतंत लागू पडेल—

जियेतें अळुमाळु । रूपा गुणाचा चाळढाळु ।
ते भलतैसाही खेळु । लेखा आणी ॥ १३.९८६
हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी ।
जडातेही माजवी । इयेचा माजु ॥ १३.९८८

## स्त्री ही भोग्यवस्तु मानणारे पिसाट

नुसते कामुक पुरुष, आणि स्त्री ही केवळ भोग्यवस्तु आहे असें मानणारे पिसाट लोक ( sex-perverse ) यांच्यांत फार फरक आहे. या पिसाट लोकांचें ज्ञानेश्वरांनी ग्रामसिंहाचा दाखला देऊन पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे—

इया ग्रामसिंहाचिया ठायीं । जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं ।
तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ॥ १३.६८१

याहिपेक्षां अटराव्या अध्यायांतील पुढील दोन ओव्या अधिक परिणामकारक आहेत—

आणि स्त्रीजात तितुकें । त्वचेंद्रियेंचि वोळखे ।
तियेंविषयीं सोयरिके । एकचि बोधु ॥ १८.५६१
जेतुलें आड पडे दिठी । तेतुलें घेचि विषयासाठीं ।
मग तें स्त्रीद्रव्य वांटीं । शिश्नोदरां ॥ १८.५५८

[ शेवटच्या ओवीच्या तिसऱ्या व चवथ्या चरणांत 'यथासंख्य' अलंकार आहे असें समजावें. ] या ओव्यांवर भाष्य करण्याची जरूरी आहे असें वाटत नाही.

## उपसंहार

अध्यात्मविद्येचें विवेचन सुबोध आणि स्पष्ट व्हावें एतदर्थ ज्ञानेश्वर उपमांचा अक्षरशः पाऊस पाडतात. या उपमांपैकीं अनेक उपमा रोजच्या व्यवहारांतील, सर्वांना पटतील अशाच आहेत. परंतु अध्यात्मविद्येच्या प्रवचनांत ज्ञानेश्वरांसारखा अत्यंत विरक्त, आणि ब्रम्हचारी पुरुष शृंगारिक ( कांहीं ठिकाणीं अतिरिक्त शृंगारिक ) उपमादृष्टांत वापरणार नाहीं असें सकृद्दर्शनीं कोणासहि वाटेल. परंतु ज्ञानेश्वरांच्या ठायीं रसिकता ओतप्रोत भरलेली असल्यामुळें आणि त्यांचें मन मूलतः कवीचेंच असल्यामुळे रसिकतेने डवरलेले व क्वचित् उत्तान शृंगाराच्याहि प्रांतांत घुटमळणारे दृष्टांत ते विनासंकोच देतात व वाचकाच्या मनावर उत्कृष्ट परिणाम घडवून आणण्याचें श्रेष्ठ कवीचे कार्य साधतात हें स्पष्ट करण्यासाठींच वरील विस्तृत विवेचन केलें आहे. या लेखांत आणखी कांहीं ओव्यांचा उल्लेख यावयास हवा होता याची मला चांगली जाणीव आहे. त्या सर्व ओव्या माझ्याजवळ नमूद केलेल्याहि आहेत. परंतु केवळ विस्तारभयास्तव त्यांचा उल्लेख टाळणें भाग आहे.

शेवटीं ज्ञानेश्वरांच्या रसिकतेचा आणखी एकच नमुना देऊन हा लेख संपवितो. फार दिवसांनी मोठा भाग्यवान पाहुणा आला आहे, स्वैपाक उत्कृष्ट झालेला आहे आणि विशेष म्हणजे वाढणारीहि सुगरण आहे—असा प्रयागयोग जमून आल्यावर जेवण कितीहि लांबले तरी थोडेंच वाटतें—

आणि समाग्यु पाहुणा ये । सुभगाचि वाढती होये ।
तैं सरो नेणें रससोये । ऐसें आथी ॥ १३.६४४ *

---

* या लेखांत सर्वत्र श्री. वा. अ. भिडे यांनीं संपादिलेल्या ज्ञानेश्वरीची प्रत (१९२८) आधारासाठीं घेतली आहे.

लघुनिबंध

# माणुसकी

लेखक :
प्रा. रामचंद्र महादेव मराठे
एम्. ए., एल्एल्. बी.

साहित्यसंगीतकलाविहीनः । साक्षात्पशुः पुच्छविषाणहीनः ॥

हें वर्णन माझ्या समोर निजलेल्या हमालाला बरोबर लागू पडलें असतें. एका मित्राला आणण्यासाठी मी स्टेशनवर गेलों होतों, आणि गाडी देईपर्यंतचा वेळ धूम्रपानांत घालवीत असतांना माझें लक्ष सहज त्या हमालाकडे गेलें. एका लोखंडी तुळईवर तो खुशाल आडवा झाला होता. तुळईचा राठपणा आणि गारवा यांचें निवारण करण्यासाठी त्याला गादी, सतरंजी अथवा निदानपक्षी धोतर–कशाची नड भासत नव्हती. पांघरुणाची गरज मुंडाशाने भागविली होती. हमालांच्या गणवेशांत मुंडाशाचा समावेश करतांना अधिकाऱ्यांनी त्यांची निद्राराधनाची गरज लक्षांत घेतली की नाही देव जाणे, तो समावेश अपेक्षेबाहेर उपयुक्त ठरला एवढें मात्र खास.

स्टेशनवरच्या गजबजाटांत आणि लखलखाटांत एवढी गाढ झोंप देते कशी याचें मला नवल वाटलें. आणि त्याच वेळीं मला वरील संस्कृत सुभाषिताची आठवण झाली. अडाणी श्रमजीवि लोकांचें जीवन पशुजीवनाप्रमाणे आहारनिद्रामैथुनांत सामावलेलें. भुकेला कोंडा आणि निजायला धोंडा इतकीच त्यांची अपेक्षा. पांढरपेशा वर्गोतील व्यक्तीला जितका वेळ या कुशीवरून त्या कुशीवर वळत सुखसुप्त व्हायला लागतो तेवढ्यांत शारीरकष्ट करणाराला गाढ झोप लागून जाते याचें कारण तरी त्याच्या मानसिक जीवनाचा संकुचितपणाच होय. अंथरुणावर पडतांच आपल्या मनांत जें विचारांचें वादळ सुरू होतें त्यामुळे पुष्कळ वेळां पुन्हा दिवा लावून एखाद्या पुस्तकांत डोकें खुपसण्याची पाळी आपणांवर देते. किंबहुना अतिरिक्त अंतर्मुखत्वाला निद्रानाशाचा शापच निसर्गाने दिला असावा.

म्हणूनच कामकऱ्यांच्या सुखनिद्रेचा बुद्धिजीवि लोकांना नेहमी हेवा वाटत आला आहे. आचार्य अत्र्यांनी आपल्या सुप्रसिद्ध कवितेने श्रीमंत आणि गरीब यांच्या रात्रचर्येतील जो चित्तवेधक विरोध रंगविला तो या वृत्तीचाच निदर्शक होय. आणि त्या विरोधांत रंगून जाणारी रसिकांची तन्मयता याच सत्याचा पुनःप्रत्यय आणून देते. हमालाला मंचकावरील परांच्या गाद्यावर झोंप येणार नाही, अथवा रस्त्यावरील खडखडाटाने न भंगणारी त्याची झोंप विजेच्या पंख्याच्या थरथराटाने मोडेल असें नव्हे. पण या वैभवाचा आणि त्याबरोबर येणाऱ्या मनोवृत्तीचा अभाव हाच मुळी त्याच्या निद्रासुखाचा आधार आहे. आणि अस्थिर सिंहासनावर आरूढ होणाऱ्या राजांना, चंचल लक्ष्मीच्या तात्कालिक अधिपतींना, किंवा सरस्वतीच्या अकिंचन उपासकांना हें निर्भर निद्रासुख मिळण्याच्या आड त्यांचें हितशत्रु मनच येतें. मोठेपणाबरोबर येणाऱ्या कठिण यातना या अशा असतात !

हमालांच्या या नित्य दृष्टीस पडणाऱ्या सुलभ निद्रेमुळे तर त्यांच्या वैचारिक जीवनाचा अभाव सिद्ध होतोच. शिवाय गाडी थांबतांच ज्या हिरीरीने ते काम मिळविण्यासाठी तुटून पडतात तीवरून भाकरीच्या तुकड्यासाठी झुंजणाऱ्या कुत्र्यांची आठवण झाल्याशिवाय रहात नाही. कोंबडे झुंजवावयाला दाणे तरी टाकावे लागतात. पण झुंजणाऱ्या हमालांची मौज रेल्वेने उतारूंसाठी फकट सिद्ध करून ठेवलेली आहे. हमालच काय त्यांचे मुकादमहि हडेलहप्पी

वृत्तीने पशूला लाजवतात. गाडी येण्यापूर्वी जरा फूटभर पुढे सरकल्याबद्दल हमालांच्या पायावर छड्या उडालेल्या ज्यांनी पाहिल्या असतील, आणि त्याच राक्षसी मुकादमापुढे लांगूलचालन करतांना तोच विद्ध हमाल ज्यांच्या दृष्टीस पडला असेल त्यांना मानवी सृष्टीतून खाली सरकल्याची जाणीव अनिवार्य आहे.

मला रा न राहून आश्चर्य वाटे कीं इतका अन्याय हे सहन कसे करतात. पण त्या लेकसण्यांत किंवा ताडनांत अन्याय आहे याची जाणीव होण्यासाठी बुद्धीची जी प्रगति आवश्यक असते तिलाच मुळीं हमाल पारखे असतात. म्हणून कुडी मानवाची पण चर्या जनावराची अशी पुष्कळदां त्यांची अवस्था दिसते.

पण म्हणून संस्कृत कवीच्या पुच्छविषाणहीन पशुकोटीमध्ये मी हमालाला ढकलण्यास तयार नाहीं. कारण त्या कवीचा सिद्धान्तच मुळी मुळांत चुकीचा आहे. साहित्य, संगीत आणि कला यांच्या अभ्यासाने मनाची आत्यंतिक उन्नति होऊं शकते याबद्दल वाद नाहीं. पण या तीन गोष्टींव्यतिरिक्त मानव्यच संभवत नाही हा निष्कर्ष अतिशयोक्तींतून उद्भवलेला आहे. किंबहुना मानव्याचा खरा निकषच कवीला कळला नाहीं म्हटलें तरी चालेल. महाभारतांतील सुदामा किंवा रामायणांतील शबरी यांना या तिन्ही गोष्टींपैकी एकीचाहि गन्ध होता असें मानण्यास पुरावा नाहीं. तरी पण सुदाम्याचे पोहे आणि शबरीचीं बोरें म्हटलीं म्हणजे उत्तम मानव्याचें प्रतीकच आपणांपुढे उभें केल्यासारखें वाटतें. कोंडाण्यावर धारातीर्थी पडलेला तानाजी, किंवा पावनखिंडींत आत्मसमर्पण करणारा बाजी यांपैकीं एकावरहि कलात्मकतेचा आरोप करतां येणार नाहीं. या दोन्ही विभूतींना उत्कृष्ट मानव्याचे आदर्श म्हणून तरुण पिढीपुढे आपण ठेवतों. स्वातंत्र्यलढ्यांत हुतात्मा झालेला बाबू गेनू आणि गेल्या महायुद्धांत व्हिक्टोरिया क्रॉस मिळविणारे नरवीर सर्वच संस्कृत कवीच्या व्याख्येने पशुकोटींत ढकलले जातील. पण तसें म्हणण्याचें धाडस डोकें ठिकाणावर असलेला कोणताहि माणूस करणार नाहीं.

माणुसकी म्हणून चीज कांहीं वेगळीच आहे. तिला संस्काराचें वावडें नसलें तरी आवश्यकता खास नाहीं. मनुष्यमात्राबद्दल वाटणारी सहानुभूति माणुसकीचा गाभा होय. अंत्यजाचें शेंबडें तान्हें मूल उचलून एकनाथाने ती दाखविली. एखाद्या भाजीवालीच्या टोपलीला हात लावूनहि ती दाखवितां येते. ही सहानुभूति सुसंस्कृततापेक्षा असंस्कृततांत जास्त आढळून येते. म्हणूनच श्रीमंतांच्या प्रासादांत जेवढे आश्रित सांपडतात त्यापेक्षा जास्त गरिबांच्या झोंपड्यांत आढळून येतात. श्रीमंतांना आपल्या पंच पक्वान्नांतील एक उचलून देणें जीवावर येतें, गरीबाला भाकरीचा तुकडा मोडून देतांना दिक्कत वाटत नाहीं. या सहानुभूतीचा ओलावा हमालांच्या जीवनांत भरपूर दिसून येतो. काम मिळविण्यासाठी हमरीतुमरीवर येणारे हमाल तेवढे आपल्याला दिसतात, आणि प्रसंगीं आत्मक्लेश सहन करूनहि परस्परांच्या गरजा भागविणारें त्यांचें औदार्य मात्र आपल्या दृष्टीआड होतें.

सहानुभूतीची परिणति प्रीतींत होते, सर्वोविषयी सद्भाव व कांहीं व्यक्तींविषयी अत्यंत निष्ठा अशी माणुसकीची उभयविध गरज असते. ही निष्ठा अनंत प्रकारांनी प्रगट होईल. सुदाम्याने ती पोह्यांची पुरचुंडी आणून आणि शबरीने गोड बोरें निवडून व्यक्त केली. एखादा मुलगा पित्याच्या कोटावर ब्रश फिरवून ती दाखवील आणि एखादा गरीब बाप खांद्यावरून मुलाला बाजारभर हिंडवून प्रगट करील. श्रांत पतीच्या चरणसंवाहनाचें स्वरूप पत्नीची निष्ठा धारण करील. प्रेमपत्रांनी, प्रणयगीतांनी, बहुमोल उपहारांनी प्रीति

रंगते खरीच. पण तिचें कुद्रती स्वरूपहि मनोहर असून ते पांढरपेशा वर्गापेक्षा हमालासारख्या अशिक्षितांतच जास्त प्रकर्षाने दिसून येतें.

प्रीतीचें एक उत्कट स्वरूप म्हणजेच आदर्श मानव्याविषयीची श्रद्धा किंवा भक्ति होय. राम, कृष्ण, बुद्ध, ख्रिस्त इत्यादि विभूतींनी जें मानव्याचें उदात्त रूप आपल्या विचार–उच्चार–आचारात रंगविलें त्यावर मोहित होऊन मानव–समाज त्यांची पूजा करीत आला आहे. या पूजेंत मृगाजिनावर बसून, सुगंधी उदबत्ती शिलगावून भगवद्गीता उघडून शिकलेला पढलेला माणूस जितका तद्रूप होईल त्याहून जास्त नव्हे तरी तितकी तन्मयता केवळ श्रुति-परंपरेने अभंग म्हणणाऱ्या टाळ कुटणाऱ्या रांगड्या हमालांत खास दिसून येईल.

माणुसकीचा सर्वोच्च निकष म्हणजे बलिदान. मानव जातीचा इतिहास अडाणी हुतात्म्यांच्या उदाहरणांनी भरलेला आहे. चंपारण्यांत महात्माजींच्या तालावर नाचणारे मजूर आणि बारडोलींत सरदाराच्या हुकमतीखाली लढणारे किसान याच सत्याची ग्वाही देतात. हिटलरच्या तुफानी सेनेचा लोंढा थोपवून धरून परतवून लावणारे रशियाचे हुतात्मे आणि डंकर्कहून परतणाऱ्या सैन्यासाठी होडी न् होडी भर दर्यांत लोटणारे इंग्लंडचे बालसारंग याच सत्याचे निनाद उमटवितात. आणि माझी खात्री आहे कीं जेव्हां तसा प्रसंग उद्भवेल तेव्हा मानवतेसाठी वा राष्ट्रासाठी आत्मसमर्पण करणारे नरवीर या लाल कुडतेवाल्या समाजांतूनहि पुढे येतील.

म्हणूनच लोखंडी तुळईवर केवळ जडगोळा होऊन पडलेल्या, अन्यायी वरिष्ठांची थुंकी झेलणाऱ्या, प्रसंगीं दोन आण्याच्या बक्षिशीसाठी लाचारी करणाऱ्या हमालांतहि जें अमोल मानव्य दडलेलें आहे त्याची जोपासना करून त्याला साहित्य-संगीत-कलेची जोड करून देणारा नवीन समाज आपणांला निर्माण केला पाहिजे केवळ संस्काराच्या अभावाने माणूस तर पशु होतच नाही, पण आपला असा आग्रह असावा कीं श्रमजीवी वर्गालाहि संस्कृत कवीच्या मतें माणुसकीला अवश्य असणारा संस्कृतीचा ठेवा अवश्य मिळावा. मात्र असें करतांना आंतील माणुसकीच्या गाभ्याला धक्का लागतां कामा नये. पुष्कळदा बेगडी संस्कृतीनें माणुसकीचा घात होऊन दंभ फोफावतो. दोन रुपये तोळा सोन्याच्या लगडी राशीवरी भरण्यापेक्षा खऱ्या सुवर्णाचा जरी एकक कण घरोघरीं दिसून आला तरी पुरे!

## भावार्थियां ख्रिस्तांवां समस्तांसी

# पाद्री थोमस एस्तेवाम

### उदंड आयुष्य सौष्य वा परमेश्वराची कृपा भाकिताये

भावार्थिया ब्रखेया ख्रिस्तावानो, ह्या पुराणांतु स्वामीया जेसूख्रिस्ता तारकाची कथा लिहिली आहे, तो कैसा मनुष्यु होऊनु सौंसारीं आला; आणि कवणा कारियासी आला त्या येणिआचा विवेकु केला. हे कथेचे दोन भाग अथवा दोनी पुराणें केलीं हाती. पैलेआ पुराणांतु सौंसार रचने ठाईं आरंभु करुनु, उदंडी उतमी करणिया देवा स्वामियान आपुला येकुची पुत्र सौंसारी पाठविणेआचे आदीं केलिया त्या करणीयांची वेवरता निरोपितों. दुसरीआ पुराणांतु जेसू तारकाचें येणें सांगुनु, तो मनुष्यु होऊन जन्मला तंव वेरी वा स्वर्ग-प्रवेसु करी परियंत तेयाचि येकत्री कथा केली आहे, तिये कथे वरउनु समस्तांसी सत्यवंता परमेश्वरा वा तेयाचिआ येकाचि पुत्रा जेसू ख्रिस्ताची वोळखी होवावेया, जेया जेसू वांचोनु आणि येक नांव जेआचे वरउनु प्राणियांसी मुक्ति जोडे ऐसें स्वर्गा खालुतें नमेळे.

हिआ सत्यवंता परमेश्वराचिया माहा वस्तु बरविया जाणावेया कारणें वा तेयाचिआ पवित्र शास्त्राचा सत्यार्थु समस्तांसी दृष्टांतु होवावेया, हें सर्व मुळारंभीं लागुनु सांगावें ऐसें मनीं होतें; म्हणउनु आदीं सांगितलें जें कैसी परमेश्वरान स्वर्गा प्रथुवीची रचना करुनु स्वर्गीं देवदूतें रचिलेया उपरांतें भूमिवैकुंठीं आमंचा आदि पुरुसु आदावां आपुलिआ प्रतिस्वरुप सारिखा रचुनु तेआवरी थोरी कृपा केली; उपरांतें सांगितलें जे तो कैसा पातका पडला आणि तेया पापा पास्वत परमेश्वराची कृपा तेयासि अंतरली आणि तो पातका वा देवचाराचा दासु जाहाला. मग तियेची ठाईं सांगितलें आहे कैसा आमंचा स्वामी परमेश्वरु कृपाळु वा करुणाकरु आमंचे सोडवणेसी प्रेरुनु चिंतूं लागला, आणि आपण आमांसी सोडउंसी सौंसारी येईन म्हणउनु पात्रिआर्कों वा प्रॉफेटांसी भास दिधली; म्हणउनु तेया पात्रिआर्कोंची वा प्रॉफेटांची कथा सांगुनु तांतांचे वर्तुणुके भितुरी स्वामिया देवान उदंडी अपूर्वी करणिया सौंसारीं केलिया येतुकिया आदि पुराणांतु सांगितलिया हाती. आणि हें येतुकें सुंटावें देखूंसी वा ख्रिस्तांवपणाची आदीवुनियादी उतमीं दृष्टी पडूंसी, पवित्र एवरुर्कीतुराचिया बहुतेकी वस्तु वा सांतां प्रॉफेटांचे साखिवाड जें हिआ कारियासी उपेगा येतातीं तें हिआ पुराणांतु लिहुनु दाविले हाती.

येणें प्रमाणें आणि येकी उतमीं परमेश्वराचिया वस्तु वेगळीया करुनु तुम्हीं ख्रिस्तांव हिआ पुराणांतु देखाल कैसा परमेश्वरु सत्यवंतु येकुचि आणि देवपणीं तेग जण हाती. आणि कैसा तोचि परमेश्वरु जें आपुलिये अपरांपरी प्रातीन रचिलें तें सदा आपुलिया अनंत ज्ञानान चालविताये वा आपुलिया ब्रखेपणान सांभाळुनु प्रतिपाळिताये आणि कैसा तो पापीयांसी शिख्या लावुनु आपुला नीतिधर्मु दाउनु देताये वा प्राश्चित्त करितलेया मनुष्यासी पातक भगंवुनु आपुली करुणा प्रघट करिताये. मग शेखीं तुम्हीं देखाल कैसा परमेश्वरु आपुलियां उतरां ठाईं भाखपाळकु वा करणीयां ठायीं सर्वज्ञानी, सर्वप्राप्तु, आणि आपुलेया भक्तां ठाईं प्रतापवंतु, येतुके परमेश्वराचे उत्तम गुण तुमांसी दृष्टी पडती.

पण देवाचिया अप्रमितां गुणां भितरी तिआची काकुळती वरुषी होउनि भिरवताचे, म्हणुनु दुसरीआ पुराणांतु काई केलें; तथा तिया पुराणातु सांगितलें जे कोणी प्रभाणें स्वामीयान आमांसी आपुलिआ स्वरूपा सारिखे रचिले तें नपुरे होउनु आपुला एकुचि पुत्रु जेसू खिस्तु आमंचे सोडवणेसी पाठविला, तो मनुष्यां कारणें मनुष्यु जाहाला तेतीस वरुषें परिर्यंत सौंसारी होता, मुक्तीचा मार्गु शिकविला, शेवटीं आमांसी मुक्ति देउंसी आपणयें कुसावरी समर्पिलें आपुलें अमोलिक रक्त, मोल पालट देउनु दोषरुप खंडिलें, मुक्तीचें दारिवठे आदिदोषा पासुनु ढांपिलें होते ते उघडे केलें आणि आपुलिया सेवकासी स्वर्गीं रिघावा दिधला.

हें येतुकें आणि हिआ होउनु अधिक तुम्ही खिस्तांव हिआं दों पुराणांतु ऐकशाल. पण तेया माजि एक सांगितलें जें तें तुम्ही बरवें करुनु मनः आणा; म्हणजे सौंसार रचना परिर्यंत विश्वतारकु पाठविन म्हणउनु परमेश्वरान पॅट्रिआर्कांसी भाख दिधली होती; आणि तोचि येणारू म्हणउनु प्रॉफेटीं आणुलिआं पुस्तकातु लिहिलें होतें; सेवटीं तोचि खिस्तु तारकु आलेया उपरांतें चौगां वांगेलिस्तीं तेआचिआं अपूर्वीं कराणीया लिहुनु, जो प्रॉफेटीं येणारू म्हणउनु लिहिलें होतें तोचि प्रतख्य आला म्हणौनु ऐसें सुटावे दृष्टांत दाविलें की तेआचिका येजेआचा दुभावो कवणा येकाचिआन प्रस्ताअें मनीं न धरवे. आणि तिआची परमेश्वराचिआ पुत्रान जेतुकिया वस्तु तो करील म्हणऊन प्रॉफेटीं सांगितलें होतें येतुकिया तेणें सौंसारी येउनु सिधि पातविलेल्या, देवा बापाची भास पाळिली आणि आपण निजु तारकु म्हणउनु सर्वां ठाईं प्रघट केलें.

हें सर्व मराठिये भासेन लिहिलें आहे. हिआ देशींचिआं भासां भितुर ही भास परमेश्वराचिआ वस्तु निरोपुंसी योग्य ऐसी दिसली म्हणउनु, पण सुध मराठी मधिमा लोकांसीं नकळे देखुनु, हिआ पुराणाचा फळु बहुतां जनांसी सुफळु होउंसी कार्य केलें, मागिलिआं कवेश्वरांची बहुतेकें अवघडें उतरें सांडुनु सांपुचेयां कवेश्वरांचिये रितुप्रमाणें आणि येकें सोंपीं ब्राम्हणांचे भासेची उतरें ठाईं ठाईं मिसारित करूनु कवित्व सोपें केलें; यापरी परमेश्वरांचे कुपेस्तंव उदंडा लोकांचें आरत पूर्ण होईल, आणि जे कवण येकादेवेळां पूर्विलिआं कावित्वांचा शृंगारू वा बरवि भास अद्यापि आठवताती ते हें कवित्व वाचुनु संतोषु मानिती आणि फावें तो फळु भोगिती; कां मागिलिआं कवीत्वाचिआं स्थानीं आणियेक कवित्व देतों तेयां होउनु फळस्त सुफळ. आणि मागिलेआं कवेश्वरांचिआं लटिकिआं उतरां वा स्वप्ना वारिये सत्यवंता परमेश्वराचे. सत्यवंत शास्त्र वा परम सुखाचा मार्गु परम भाक्ति शिकविती, जिये शिकवणें निभिर्ती तेयांचिआं आणि आमंचिआ शास्त्रां भितुरी केवडें अंतर आहे तें समस्तांसी ठाउकें होईल, जितुकें अंतर उजुवाडा वा अंधारासी, सत्या वा लटिकासी, वैकुंठा वा यमकोंडासी, परमेश्वरा वा देवाचारासी आहे. येतुकें आमंचिआ शास्त्रा आणि आणियेका शास्त्राभितुरी अंतर आहे ऐसें म्हणउनु समस्त देखती, म्हणउनु आमी हिआ आमंचिआ पुराणांतु तेयांचें शास्त्र लटिक आणि आमंचें सत्य ऐसे म्हणउनु दाउंसी नाहीं कष्टवतों; कां तें आपैसें समस्तांसी दृष्टी पडता ये; खिस्तावांचे शास्त्र आपणपें शोभताये मिरवताये वा तेंची बरवें म्हणउनु आपणवें दावुनु देतांये; वाचिलेया ऐकिलेया पुरे.

जैसे रात्रीचे प्राहार सरलेया सूर्यु उदेवो करूनु आपुलीं किरणें दाहीं दीसां विस्तारिताये तंव काळोखा होउनु उजुवाडु बरवा काई ऐसे कवणुई न पुसे, मनीं दुभावो न धरी,

तैसेची सांता वांगेलाचा उजुवाडु समस्तांचे दृष्टी फुडां ऐसा निटळु, झगझगितु, निष्कळंकु दिसताये की जो कवणु तेयाचे तेज न देखावेया आपुले डोळे बळीवाडें डांपित नाहीं तो सादृष्ट देखैल आणि मुखें उच्चारिल; तेआचे उपमेन आणि येकी वस्तु ऐसी बरवी, निर्मळी, पवित्री, उतमी, सौंसारांतु न मेळे; म्हणउनु येरिकडे कोणुइ प्राणि केवडाइ नेणारू, मुर्खु अल्पमतीचा जाहला तरी तेणे हिआ देशीचिआं पुराणातु जीआ अवाधि लटिकी वस्तु लिहिलिआ हाती तिया येकी वेळे ऐकिलेया वरी कवण गुळाचिआ निपजलीया तिया निवडूंसी अवघड नव्हेल.

म्हणउनु खिस्तांव तुम्ही उदंड करुनु परमेश्वरासी आगें दिआ आणि उपेगु माना कां तुमांसी यमकोंडीचिआ मार्गाचे वा अनुभावार्थियांचिआ अंधकारातुले काडुनू खितांवपणा भितरी मेळसें केलें. तिआचिआ उतमा शास्त्राचा उजुवाड भोगुंसी आर्मी जें कार्य करूंसी आधारीलें तें परमेश्वराचे कृपेस्तंव आमचे अल्प शक्ति सांगाडे सिधि पावलें; दों पुराणाचे अभंग केले तेयां माजी कांहीं उतरांची चुकी जाहालेया वरी ती तुमी खमा करा. मज येतुकें आहे पुरे, जरी जें तुमांसी हें पुराण सरलें देखूंसी आरत होतें, तेंचि आतां तें वाचूंसी तुमांसी आरत होउनु तेयांचा फळु जरी भोगीशाल तरी तें दैव माजें. तुमी दिने दिनु अधिक अधिक खिस्तांव भाक्ति करुनु सत्य भावो मनीं दृढ धरुनु शेवटु परीयेंत पुण्य पुरुषार्थाचे मार्गी चाला ऐसें म्हणउन तमा कारणें परमेश्वरापासीं विनंति करितों.

छायाकार—प्रा. वा. दा. गोखले.

---

## परीक्षण

**पोंक्षे-कुल-वृत्तान्त**—( संपा० भा. सी. पोंक्षे, प्रकाशक भा. इ. सं. मंडळ, पुणें. किं. ५ रु).

कुलवृत्तान्त हे ऐतिहासिक साधनांपैकींच होत. कुलांचा इतिहास राष्ट्रेतिहासाचाच एक घटक असून त्याचें महत्त्व इतिहासज्ञांस पटलेलें आहे व असे कुलवृत्तान्त बरेच तयार झाले आहेत व होत आहेत. पोंक्षे कुळांत फार थोर पुरुष होऊन गेले नसले तरी राजकारणांत प्रत्यक्ष वावरणारे कांही सांपडतील. असे वृत्तान्त लिहिण्यास संपादकांना साहित्य जमविण्यास फार श्रम पडतात. आपली स्वतःची माहिती जेथे कुलपुरुष देण्याविषयीं हलगरजी असतात तेथें त्यांच्या कुटुंबाची साधार व सविस्तर कशी मिळावी ? बरें, अशी समग्र माहिती जमल्याखेरीज संपादन-प्रकाशन करतां येत नाही. या दृष्टीने पाहता श्री. भा. सी. पोंक्षे यांनी लेखकाचा–संपादकाचा पेशा नसतांहि केवळ कुलऋण फेडण्यासाठीं केवढा जिवाचा आटापिटा केला हें प्रस्तावनेवरून कळेल. कुलवृत्तान्त संपादनाचे एक निराळेंच शास्त्र आहे. त्यास अनुसरून हा ग्रंथ रचला गेला आहे. विशेषतः पोंक्षे उपनामधारण करणाऱ्यांनी याचें चीज केलें पाहिजे.

—चिं. ग. कर्वे

## — परीक्षणें —

# नवीन कवितासंग्रह

या वर्षी काव्याला नवीन बहर आलेला दिसतो. त्यांत कांही नवीन रोप फुलें धरूं लागलेले आढळतात तर कांही पूर्वपरिचित काव्यकुंजांची नवी हौसहि नजरेस येते.

नव्या नवलाईच्या प्रकाशनांत प्रो. भावे यांचा *आर्द्रा हा कवितासंग्रह अनेक रीतीने लक्षांत राहण्यासारखा आहे. छपाईचा व सजावटीचा साधेपणा—व प्रतीकात्मकता — हा तर उघड उघड दिसणारा 'विशेष' आहेच. पण काव्यगुणांच्या दृष्टीनेहि तो संग्रह बराच वरच्या दर्जाचा आहे असें म्हणावें लागतें — म्हणजे या प्रकारचें काव्य प्रगतिपथावर आहे असें मान्य करावें लागतें. काव्याच्या ठराविक सांच्याबाहेर ज्यांची नजर जाऊंच शकत नाही त्यांना यात पूर्वीचें गृहीत धरलेलें पावित्र्य, सौंदर्य किंवा मांगल्य नाहीं दिसणार कदाचित्, पण ज्यांनी आपले डोळे मिटून ठेवलेले नाहीत अशांना यांत वर्णिलेल्या जड, जुगुप्साजनक वातावरणाचें सत्य पटल्यावांचून राहणार नाही; आणि जे अनुभव मनाला उमगले, हृदयाला भिडले, ते उत्कट अनुभव कविताद्वारा प्रकट होण्याची धडपड करूं लागले तर त्यांत काव्यहीन असें कांही वाटणार नाही. या उग्रप्रधान कवितेंत अनेक ठिकाणीं धारदार उपहास व उपरोध बोचल्यावांचून राहत नाही. 'विवस्त्र पांचाली,' 'वठूनि गेला,' 'चोयट्या' इत्यादि कवितांत हा उपरोध बराच तीव्र आहे, तर 'रम्य भाविकाल,' 'समान संधी,' जगशांतीची करा निर्मिति' यांत ती औपरोधिक धार उपहासाचें स्वरूपहि धारण करते. या तऱ्हेच्या विशिष्ट वातावरणाच्या कवितांत कल्पनांच्या प्रतिमाहि विशेष तऱ्हेच्या असतात. प्रो. भावे यांच्या या तऱ्हेच्या कवितांत नेहमीच नव-प्रतिमांचा वापर आढळतो असें नाहीं, उलट अनेक वेळा त्यांनी जुन्या संस्कृत-प्राकृत वाङ्मयांतील प्रतीकांचा व उल्लेखांचाहि उपयोग मोठ्या मार्मिकपणें केलेला आढळतो. पहिल्याच कवितेंतील विवस्त्र पांचाली, विश्वामित्र-मेनकेचा 'तेवढाच स्थिर प्रकाश-किरण' मधील उल्लेख' 'डोळ्यांपुढून' मधील महारुद्राचा तृतीय नेत्र व 'ताहिता' व्योमाचा उल्लेख, इत्यादि स्थळीं त्यांची जडण अतिशय समर्पकपणें झालेली प्रत्ययास येते. या नव कवितेची खास प्रतिनिधि वाटावी अशी संदिग्ध, सूचक वातावरणाची म्हणून 'धुकें घासतें पाठ' ही कविता पाहावी. बाह्य वातावरण धुकाटलें आहे, मनहि कोंदाटलें आहे. बाहेरच्या धुक्यामुळें एक प्रकारचें धूसर आकर्षक सौंदर्य निर्माण झालें आहे, पण

अंतर्व्योमांत...
काळ्याकभिन्न, शुष्कस्तनी, नग्न
नाचती भिल्लीणी—

---

* आर्द्रा— कवि प्रा. य. द. भावे; प्रका.— अजित एजन्सी, टिळक चौक, बेळगांव, मूल्य दोन रु.

केशकलापाचे पाश फेंकिती
तंतू तोडिती
नाजूक चांदणी मच्छरदाणीचे

प्रो. भाव्यांची ही कविता श्री मर्ढेकरांच्या कवितेच्या प्रकारची वाटते—म्हणजे त्यांची वातावरणाची निवड बरीचशी सारख्या तऱ्हेची आहे. परंतु तंत्र व शैली यांत मोठा भेद आहे. श्री. मर्ढेकरांचें कविताविश्व बाह्य विश्वासारखेंच गुंतागुंतीचें, अगम्य आहे. त्यांच्या कल्पनाप्रतिमा व रचनातंत्र हींदेखील अनेक स्थळीं प्रयत्नगम्य आहेत. प्रो. भावे यांची रचनाशैली त्या मानानें बरीचशी सहज, म्हणजे कांहींशी जुन्या वळणाचीच, आहे असें म्हटलें पाहिजे. कवीच्या मनोवृत्तीच्या व एकंदर घडणीच्या फरकामुळे हा फरकहि काव्यांत दिसतो.

'चालली आहे ही आगगाडी' आणि 'आर्द्रा' या कवितांकडे लक्ष दिल्यास तेथे ओघ किती स्वाभाविक व आशय किती साहजिक वाटतो ! मोठ्या जोरदार अशा त्या कविता कवीच्या उत्तम कवितांपैकी आहेत आणि कवीची प्रतीकात्मकताहि त्या कवितांतच अनुभवाला येते. स्थलकालबद्ध यांत्रिक आगगाडीचें जीवनाच्या गतिमान यानाशीं साधर्म्य कल्पून मग त्या द्वारें ध्येयवादाचें सूचन कवीनें केलें आहे.

आणि राहून स्थलकालाच्या मर्यादेंतहि
दिक्काल सीमांच्या— जाऊं पलीकडे
या साठींच कां—
झुकझुकत भकभकत
सोडे वाफ धूर
झर्झर भर्भर धांवे आगगाडी
युगायुगांतून
ही आगगाडी ?

भूत-भविष्य-वर्तमानांच्या भेदाभेदांतून " ताळ मेळ गांठण्यासाठीं " ही आगगाडी धांवते काय ? " सौंदर्यस्वप्नांची सत्त्वपरिणति, शिवपरिपूर्ति " होण्यासाठींच ही आगगाडी बेफामपणें धावते काय ? असे प्रश्न कवीच्या मनाला ग्रासून टाकतात व त्यांतूनच वर उल्लेखिलेला आशावाद प्रकट होतो.

' आर्द्रा ' ही कविता सर्व संग्रहांत उजवी आहे. स्थलकालाच्या जन्मापासूनच " विश्वावकाशाची, व्योमसागराची " चिरप्रवासिनी अशी ही तेजस्विनी, सुहासिनी आर्द्रा आहे. तिचें रूप द्विविध आहे. भैरव आणि कोमल. चामुंडारूपधारिणी आर्द्रा ' हिमापरी शुभ्र सृजनतत्त्वाच्या शुभापित्याला ' नष्ट करण्यासाठीं जे सृजनतत्त्वाचे हाडवैरी पाठीस लागलेले असतात त्यांचा संहार करते आणि त्या दीनाला आपल्या नौकेंत आश्रय देते. अशी ही संहारमूर्ति आर्द्राच प्रेमल मूर्तीहि बनते. तिला भास होतो की

व्योमरंगापरि शांत–रम्य शांत
चैतन्यस्वरूपी
श्यामप्रेममूर्ति
वाजवी वीणा

आणि त्या वीणेच्या झंकारानें तिचें मृदु जीवनतत्त्व संवेदित होतें

आल्हादते ती आणि सजविते
अवकाशाला
इंद्रधनुष्याच्या रंगीबेरंगी मृदुच्छटांनी
आणि वर्षते ती
जीवनधारा
कोमला प्रेमला प्रवासिनी आर्द्रा !

आणि सत्कवितेचें कार्यहि हेंच असल्यामुळे कोपिष्ठ आणि कोमल अशा दोन्ही रूपांत प्रकट झालेली या आर्द्रा–संग्रहांतील 'आर्द्रा' कविताहि जीवनविकासाची पाठराखण करील अशी झाली आहे.

*स्वेदगंगा—या कवितासंग्रहाचें स्वरूप याहून भिन्न आहे. यांतील कविताहि नवीनच, पण 'नवकविता' म्हणून विशिष्ट नांव प्राप्त झालेल्यांतील ही कविता नव्हे. यांत नवीनपणा आहे, अगदी समाजवादी वाटण्याएवढा पुरोगामीपणा आहे. कवीच्या मतांची व जीवनविषयक दृष्टिकोणाची स्पष्ट छाया काव्यावर पडली आहे.

'स्वेदगंगा' या नांवाच्या प्रदीर्घ कवितेंत, तसेंच 'मजूर,' 'साक्षात्कार' यांतहि हें तत्त्वज्ञान सूचित झालेलें आहे. 'स्वेदगंगा' हें नांवच सूचक आहे. पृथ्वीवरची भागीरथी व स्वर्गांतील आकाशगंगा याच तेवढ्या गंगा व तिसरी होती ती गुप्त झाली असें बोलणें चाललें असतां कवि त्यांना बजावतो कीं, ती तिसरी गंगा लुप्त झाली नसून स्वेदगंगेच्या रूपाने पृथ्वीवरच घोंघावत आहे; घामाच्या थेंबांतून उत्पन्न होणारी ती गंगा जोराने वाहते आहे, तीवर जीवननौका नाचते आहे, खाणी खड्डे बुजवीत ती चालली आहे, युगायुगांचा प्रवाह बदलीत ती जुलमी गादीला धुळीस मिळवीत धांवते आहे.

स्वेदाची ही अखंड गंगा—
तांबडमाती काळें पाणी--
गात नवीं क्रांतीचीं गाणीं
विविध मुखांनीं, विविध दिशांनीं,
शोधित सागर संघटनेचा;
स्वातंत्र्याचा, नव्या युगाचा.

अशी ही स्वेदगंगा कांचनगंगेहून सुंदर आहे, भागीरथीहून पावन तर आहे, एवढेंच काय पण परमेशाहून जनहिततत्परहि तीच आहे !

कवि श्री. विंदा करंदीकर यांना संघटनेचें प्रेम फार दिसतें. 'आवाहन' कावितेंतहि त्यांनी नवयुवकांना "संघटनेची तलवार" हातीं घ्यायला हांक दिली आहे. पण या समाजवादी कलाबरोबर राष्ट्रवादी प्रेमहि आहेच. 'भारत विजयी' व्हावा असें कवीस वाटतें, तिरंगी झेंड्याचा विजय असो असें गीत त्यांनी गाइलें आहे; आणि त्यांचें मन तर मानवतावादीहि आहे; गांधीजींच्या वधानंतर त्यांनी लिहिलेली 'काय केलेंस हें?' ही कविता याची द्योतक आहे :

---

*स्वेदगंगा— कवि विंदा करंदीकर, प्रका०— गो. वि. करंदीकर, मधुवन, रत्नागिरी. मूल्य तीन रु.

पूर्वेच्या दारांतिल नंदादिप मालवला !
पूर्वेच्या कंठांतिल मंगलमणि रे तुटला !
मानवता दीन आज; सह्याद्री-शीर लीन.
आज पूर्व विधवा, अन् भारत रे पितृहीन.

'होळी' कविता अशीच नवयुगाची ललकारी आहे. जुन्या रूढींची, भेदांची, घाणीची होळी करा.

आणिक होळी मढवा.
खड्डा खोल खणा रे,
आणिक टाका मूळ गाडुनी सारें,
देव तिथें द्या ठेवून;
टाका आणुन त्याच्यावरती सरपण.

स्वेदांची गंगा परमेशाहून जनहिततत्पर होय आणि देवाला होळीच्या खड्ड्यांत गाडून त्यावर सर्पण पेटवणें हें श्रेयस्कर होय असें मानणारा आधुनिक 'बुतशिकनां' चा मोठा संच साहित्याच्या प्रांतांत तयार होत आहे. ही मूर्तिभंजक बंडखोरी काव्यांत केशवसुतांनी सुरू केल्यापासून काव्याने तरी आपली दृष्टि प्रगत ठेवण्याचा वेळोवेळीं प्रयत्न केला आहे.

याच संदर्भांत 'दगडांतून देवाकडे' या वीस पानी दीर्घ कवितेचा उल्लेख करणें अवश्य आहे. त्यांत कवीची विचारदृष्टि व गांभीर्य उत्तम प्रकारें दिसून येतें.

सदर्हु संग्रहांत सामाजिक क्रांतिवादी कवितांव्यतिरिक्त प्रेमविषयकहि बऱ्याच कविता आहेत, वात्सल्याच्या बऱ्याच आहेत, नाखव्यांच्या भाषेंतील प्रेमगीतें आहेत आणि जागोजागीं चमत्कृतिजनक चुटके पेरलेले आहेत. प्रेमगीतांत सोज्ज्वल व सहज ओघवान् वाटणारीं कांही गीतें आहेत. 'तूं व जीवन' हें विशेषत: बरें आहे. बाकीच्यांत 'लाज', 'तयारी' 'रक्तसमाधी' यांसारखीं उत्तानतेच्या काठावर पोंचणारीं गीतेंहि आहेत. कवि प्रीतीच्या धुंदींत सारीं अंतरें तोडूं पाहतो आहे. त्याला गीत-मद्याचा प्याला प्यायला व झिंगायला मिळाला कीं, त्याची "जीविताच्या संगराची" 'तयारी' झाली !

'रक्तसमाधि' अशीच दोन विवस्त्र धुंद प्रेमिकांच्या बंधनातीत मीलनाच्या वेळीं दोन रक्तांची (!) लागलेली समाधि आहे व त्यांतूनच अद्वैतासिद्धि झाली !

रक्तसमाधी लागुन विरली माया;
रक्तांतुनिया रक्त मिसळलें जीवन पुढतीं न्याया !

यांतील ध्वनि जीवशास्त्रीय आहे कीं, समाजशास्त्रीय आहे तें कांही सांगतां येत नाहीं. पण ही अनुभूति ( असेल तर ) नीटपणें व्यक्त झालेली नाही. सूचकपणाहि हवा तेवढा सूचक नाहीं असें म्हणावें लागतें. असें असूनहि अशा प्रेमांत गुंगलेला जीव मरणालाहि पळून जा म्हणून सांगतो आहे. प्रेमाचा 'विजय' कसा आहे ? मरणा ऐक :

उगाच करशिल धाडस भीषण !
या रमणीचें घडतां दर्शन—
शिकशिल तूंही प्रेम कराया,
आणिक वेड्या !
मरणकला तव जाशिल विसरून !!

यांतील सूचित भावार्थ हृदयंगम आहे हें कोणालाहि पटावें :

इतर कवितांतील दोहोंमधलीं शब्दचित्रें चांगलीं रेखाटलेलीं आहेत. एक खेड्यांतील ' कीर्तन ' काराचें विनोदप्रधान आणि ' सरोज नवाबनगरवाली ' हें एका गरीब वेश्येचें कारुण्यमय. आणि ' भावय ' ही कविता शेवटचें भरतवाक्य म्हणून दिली आहे ती छानच आहे. पादाकुलकाच्या ओघवती रचनेची जोड आंतील उदात्त भावनेला व प्रेरक विचाराला मिळाली आहे. देवळाच्या जवळ लोक ' भावय ' नाचत आहेत. तेव्हां कवीला सर्व " जनते " च्या अद्वैताची जाणीव होते :

'जनता', 'जनता', 'जनता' आपण;
अद्वैताचे या नारायण.
बुडवूं मीपण; बनूं प्रेममय.
'नाचा भावय ! नाचा भावय ! '

पुढें कवि जनतेला " समान व मृत्युंजय " व्हावयास सांगतो व शेवटीं म्हणतो :

या चिखलाची लावुनि टिकली
विसरुनि जाऊं चिन्हें नकली
माणुसकीचें बांधूं मंदिर—
बंधुत्वाचें एकच नातें
मानुनि पुजुं या नव–मानवते—
मानवतेचा बोला रे जय;
'नाचा भावय ! नाचा भावय !'

असें या **स्वेदबिंदु** संग्रहांतील वातावरण आहे. आर्द्राच्या मानानें किंचित् जुन्या थाटाचेंच वाटणारें, कल्पना व शैलीच्या दृष्टीनें 'नवकवितें'त मोडलें न जाणारें असें याचें स्वरूप आहे. एक गोष्ट मात्र उल्लेखिणें अवश्य आहे.

" आर्द्रा "मधील अनेक मुक्तछंदी कवितेंतील छंद प्रायः पंचाक्षरी–षडक्षरी आवर्तनांचा आहे. **स्वेदगंगे**'त कित्येक ठिकाणीं स्वैररचना आहे ती लगत्वानुसारी आवर्तनांची आहे—बहुधा पादाकुलकांतीलच आहे. वर उल्लेखिण्यांत आलेल्या "होळी', 'मजूर', 'कीर्तन', 'सरोज नवाबनगरवाली', 'रक्तसमाधी' वगैरे व इतर बऱ्याच कविता अशा रचनेच्या आहेत. ( कांहीं उतारे वर आलेच आहेत. ) या रचनेंतील एक खास गोष्ट म्हणजे तिच्यावरील हिंदीमधील तत्सम रचनेची छापः अंत्य अक्षर लघु ठेवून चरण लगेच पुढील अक्षरांशीं जुळवून म्हणतांना होणारी अक्षरांची द्रुत हालचाल मोठी परिणामकारक वाटते.

या दोन संग्रहांनंतर संजीवनी, बी. ए., यांच्या **छाया*** नामक कवितासंग्रहाकडे वळलों म्हणजे एकदम फरक जाणवतो. सौ. संजीवनी या सौंदर्यदृष्टीच्या कवयित्री आहेत. विचारशीलता व आशयप्राधान्य हे त्यांच्या कवितेचे विशेष नसून प्रणयाकुल, भावस्पर्शी, सौंदर्यलक्षी वातावरण हा त्या कवितेचा खास गुण होय. संदेहमय, विश्लेषणात्मक सूक्ष्म अवलोकन व अनुभूती यांपेक्षा श्रद्धावंत, समन्वयदर्शी, स्थूल सौंदर्यदर्शन त्यांच्या काव्यप्रकृतीला अधिक मानवतें. या संग्रहांत बऱ्याच कविता कवयित्रीनें प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणें

* छाया—कवयित्री व प्रका० सौ. संजीवनी मराठे, बी. ए. ठळकवाडी, बेळगांव, एकमेव विक्रेते के. भि. ढवळे, मुंबई ४, मूल्य अडीच रु.

काव्यप्रतिभेला उद्देशून लिहिलेल्या आहेत. त्यांत त्यांना विशालतेची तळमळ लागलेली आहे असें आढळतें. 'माझ्या प्रतिभे' या कवितेंत त्या म्हणतात कीं, प्रणय, वत्सलता, सृष्टिसौंदर्य हीं कामें आतां इतरांकडे सोंपव आणि, माझ्या प्रतिभे, तूं जे निजले त्यांना जागव, जागणाऱ्यांना खडे कर व खडे असलेल्यांना घोडदौडीचे धडे दे. जे पराजित आहेत त्यांना उसळत्या उत्साहाचें बल पुरव. आजवर मी तुला रक्ताश्रु सिंचून पोसलें, शब्दांनी नटाविलें—सजविलें व कल्पनाजळानें न्हाऊं घातलें. पण आतां तूं माझ्या हृदयांतील आग व्यक्त कर आणि विश्वरूपिणी हो ! मोठी उदात्त भावना आहे, उत्तम ध्येयवाद आहे. पण प्रत्यक्ष एकंदर कवितांत पाहतां ही विश्वरूपात्मकता रांगड्या शब्दांत, आवेशी व आवेगी रचनेंत प्रकट झालेली दिसत नाहीं. आहे ती विश्वरूपात्मकता मूळच्या अद्भुतताप्रेमी, सौंदर्यदर्शी काव्यात्मतेच्या द्वारेंच प्रकट होते. त्यांत विशेष कांहीं बिघडलें असें नाहीं. पण कवयित्रीला आपल्या माध्यमाच्या मर्यादांची जाणीव तितकीशी झाली नसावी असें वाटण्याइतका हा विरोध वारंवार नजरेस येत असल्यामुळे त्याचें दिग्दर्शन करावें लागलें.

या संग्रहांतील एकंदर ७५ कवितांत १५–१६ कविता उत्तम म्हणून सहज दाखवितां येतील. 'स्वातंत्र्याचें गान' या ४६ व्या कवितेच्या पुढच्या राष्ट्रप्रेममय गाण्यां वजा करतां व कविताविषयक गीतें सोडतां उरलेल्यांत एवढीं गीतें चांगलीं असणें कमी म्हणतां येणार नाही, आणि जीं उत्तम म्हणतां येणार नाहीत त्यांतहि रचनेची सफाई, शब्दांचा गोडवा हीं आहेतच; तो तर सौ. संजीवनीबाईंच्या कवितेचा विशेष म्हटला पाहिजे.

आतां उत्तमांपैकीं कांहीं कवितांचें दिग्दर्शन करावयाचें. पहिलीच 'प्रार्थना' ही कविता मनाला एकदम हळुवार व गोड स्पर्श करते.

काजळलेल्या हृदयीं माझ्या तुझें तेज फांकुं दे
तुझ्या कृपेचा हात माझिया शिरावरी राहुं दे......
...जीवनवीणेवर आशेची एकतार वाजुं दे
तव इच्छेच्या तालावरि मज गीत गात जाऊं दे--

'एक गीत' अतिशय मधुर आहे. कवयित्रीच्या मनाची चाललेली तळमळ त्यांत उत्तम प्रकारें प्रकट होते.

दुःखावेगें पीडित माझें गीत हवें का तुला ?
अश्रुफुलांनी सजवियलें हें चित्त हवें का तुला ?

'म्हणतें ना, मी येईन ! ' यामधील हळुवारपणा हृदयस्पर्शी आहे, तर 'वेड' कवितेंतील हळहळ व हुरहुर मनोवेधक आहेत. 'मनांतलें' हें गीतहि असेंच हृद्य आहे. 'अनुकार', 'गृहिणी मी येथ' तशाच हृदयंगम आहेत. 'आज घरास यायची' या कवितेंत मायेची माउली घरास येणार म्हणून वाटणाऱ्या आनंदाचें हळुवार स्पर्शाने रेखाटलेलें चित्र आहे.

प्रासंगिक कवितांतहि एखादी कशी चांगली वठते याचें प्रत्यंतर 'घडवा अम्हांस साक्षात्कार' यांत येते. 'नेई प्रकाशाकडे' या कवितेंत मनाची प्रकाशाकडे जाण्याची तळमळ व्यक्त होते. आणखीहि कांहीं अशा कविता दाखवितां येतील कीं, ज्यांत कवयित्रीचें सुंदरतेचें प्रेम प्रकट झालें आहे. एकंदरींत रांगड्या, प्रक्षुब्ध गीतांची तळमळ लागली आहे असें कवयित्री म्हणत असली तरी त्या जाणीवेमुळें तिच्या मूळच्या बैठकीला उत्कट-

तेचा लाभ होतो एवढेच. ती मूळची बैठक 'सुंदरते सखि' या गीतांत खरी व्यक्त झाली आहे.

सुंदरते तव पायीं
जीवनलय लागावी
तव करेंच मुक्तिलाभ व्हायचा मला
सुंदरते सखि मजला लाविसी लळा !

ही खरी श्रद्धा, निष्ठा; बाकीची तळमळ हे क्षणिक आवेग, उद्वेग. कवयित्रीने भरधांवपणें नव्हे तर संयमाने आपली सौंदर्याची पूजा चालू ठेवली तर मराठी कवितेला आणखी अनेक गीतरत्नांचा साज लाभल्यावांचून रहाणार नाही.

**पहांटवारा*** हा प्रो. वि. म. कुलकर्णी यांचा कवितासंग्रह वरील संग्रहासारखाच नवीन कवितासंग्रह आहे. **विसर्जन** नांवाच्या त्यांच्या दीर्घ भावकाव्यांत ज्या विशेषांची अपेक्षा उत्पन्न झाली होती ते विशेष यांत प्रामुख्याने आहेत : मोहक रचना, वेंचक शब्द, व्यवस्थित छंदोरचना आणि चमत्कृतिचा पगडा या गोष्टी या संग्रहांत आहेत. परंतु कवीच्या मनांत संघर्षहि चालला असल्याची जाणीव कांही कवितावरून आपणाला होते. रूढ सौंदर्यसंकेतांच्या बाजूबाजूने जाणाऱ्या त्यांच्या कवितेंत मधेंच आवेगाचे झटके जाणवूं लागतात. पण अखेरचा परिणाम रम्यतावादी सौंदर्यस्पर्शीच होतो, प्रक्षुब्ध आशयप्राधान्याचा नव्हे. 'श्रमदेवता', 'सोनेरी नागास', यांत रूढ आर्थिक व्यवस्थेबद्दलचा तिटकारा दिसतो, 'खेड्यांतील एक सायंकाळ' यांत चालू काळच्या राजकीय आंदोलनांचे पडसाद उमटतात, 'अणुस्फोटक' या आविष्टी कवितेंत मानवतेचें प्रेम दृग्गोचर होतें आणि या मागची "मनीषा" त्याच नांवाच्या ('मनीषा') कवितेंत स्पष्टच ऐकूं येते :

अन् धगधगतां स्थंडिल भोंतीं—
घेत अनाथांच्याच आहुती,
थांबुनियां तें, व्हाया शांति
अल्पशा अर्पिंग्या बलिदाना,
नरजन्म मिळो हा पुनः पुन्हा !

अर्थात् असें बलिदान करणाऱ्या हुतात्म्यांच्या अग्रेसराबद्दल—महात्मा गांधींबद्दल—त्यांनीं जी 'एक महात्मा होउनि गेला' या नांवाची कविता लिहिली आहे तींत हीच तळमळ व्यक्त व्हावी यांत काय नवल? गांधीजीविषयक चांगल्या कवितांत या कवितेची सहज गणना करतां येईल :

रक्ताचा तो अंतिम थेंब
यज्ञ-सांगता करून गेला.

'महात्म्यांचें रक्त' या लहानशा कवितेंत हाच भाव परिणामकारकपणें व्यक्त झालेला आहे :

---

*पहांटवारा—कवि व प्रका०—प्रो. वि. म. कुलकर्णी, "सरस्वती", गोंधळी गल्ली, बेळगांव, मूल्य २ रु.

मानवतेच्या या—बालपणीं तिचें
पोषण-वर्धन करावयासाठीं
सांडावें लागतें . महात्म्यांचें रक्त !
महात्म्यांचें रक्त ! !

परंतु हें वातावरण अधून-मधून जाणवतें, बहुसंख्य कवितांत गोड गीतांचे सूरच ऐकूं देतात. मात्र काही गीतांत सामाजिक उपरोधाची छटाहि आढळून येते. 'उंच हवेली, हिरवी माडी' यांत रंगेल नर्तिका आणि भुकेलेली भिकारीण यांच्या विरोधाने रंगविलेलें वातावरण आणि 'लमाणांचा तांडा' या बाह्यतः वर्णनपर पण आंतून अतिशय सूचक अशा गीतांत लमाण जातीच्या मानव्याची ध्वनित झालेली खूण, यामुळे त्या कवितांना उंच पातळी लाभली आहे. 'लमाणांचा तांडा' ही कविता या संग्रहांतील एक उत्तम कविता आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

गोड रचनेच्या भाव-गीतांत 'अबोध हुरहुर' ही कविता अतिशय सूचक व मोहक झालेली आहे. मनातील सूक्ष्म हुरहुरीचें उत्तम शब्दचित्र त्यांत उमटलें आहे. 'माझा उजळ उंबरा', 'साक्षात्कार', 'कधीं वाटतें', वगैरे प्रेमगीतें चांगलीं वठलीं आहेत. 'भास', 'नवलाईचें चांदणें' यांतील नाट्यस्पर्श हृदयंगम आहे. 'वेडी आस' या कवितेंत मातृप्रेमाची महती आहे. केवळ वर्णनात्मक अशा 'घंटांची किणकिण', 'कार्तिकाच्या प्रदोषकाळीं' 'नवे पाणी', 'गुलाबाची कळी' इत्यादि कवितांत मनोवेधकता आहे.

रचनाशैलीच्या बाबतींत कवीनें वापरलेल्या मुक्तछंदाचा खास उल्लेख केला पाहिजे. तो पंचाक्षरी-षडक्षरीच आहे, पण मोठा नीटस रचनेचा व आवेशपूर्ण आहे. 'अणुस्फोटक' ही कविता याचें उत्तम उदाहरण आहे :

एका क्षणांत......
जीवनाच्या सर्व इष्टदेवता
दीर्घ आक्रंदत आचके देत
......गेल्या जळून.
मुठीएवढा एक स्फोटक
विधात्याचें एक मधुर स्वप्न
भंगून टाकी !

'सोनेरी नागास' 'अखंड धरणावरील पिंपळ', 'समाधान' या कवितांतील मुक्तछंदाचा उपयोग समर्पक आहे. 'समाधान' कविता तर या संग्रहांतील एकुलती एक नवकविते'ची प्रतिध्वनि म्हणावी लागेल. एका हॉटेलपुढचें गिऱ्हाइकाचें व भिकाऱ्याचें दृश्य आहे तें मोठें वास्तवस्पर्शी आणि विचारक्षोभक आहे.

**पहांटवारा** संग्रहाचें वातावरण असें बहुतांशीं सौंदर्यलक्षी, पण क्वचित स्थळीं वास्तवदर्शी, उपरोधपूर्ण, आशयसूचक व आवेशी झालें आहे. अजून कवीची वृत्ति शब्दांचे फुलोरे फुलविण्याकडेच जास्त वळते. त्याऐवजीं सुघन रचना संयमपूर्वक अधिकाधिक उपयोगांत आणली म्हणजे कवीचें विशालतेच्या तळमळीचें स्वप्न संपूर्णपणें सफल झालेलें दिसेल.

*प्रतिबिंब हा श्री. वा. कृ. परांजपे यांचा कवितासंग्रह म्हणजे हौशीचा मामला आहे. कवीची काव्यविषयक दृष्टि चांगली आहे. 'भूमिके'त तो ह्मणतो, " इतके दिवस कविता हा जगांतल्या विषमतेनें दुभंगलेल्या व दुखावलेल्या समाजाचा मंद आक्रोश होता. त्रस्त मानवाची ती एक किंकाळी होती. पण आतां दिवसेंदिवस ती एक गर्जना होऊं पहात आहे..." ' प्रतिबिंब ' या कवितेंत कवि म्हणतो :

हृदरे जेव्हां धडकांनीं बोले तेव्हां शद्बांनीं
तेंच काव्य—त्या काव्याला पकडा येंबांथेंबाला

'ध्येयगीत' मध्यें केशवसुतांच्या पद्धतीनें कवि म्हणतो आहे.

नव्या युगाचे नव्या जगाचे शूर वीर आम्ही
जमुनी चालूं एक दिलानें निशाण उचलोनी
निशाण कोणाचें । निशाण क्रांतीचें । उदात्त ध्येयाचें

परंतु एकंदर संग्रहांत सर्वसाधारण पद्यप्रकारांचाच भरणा सर्वांत जास्त आहे. 'नाम्या' 'दिवंगत प्रियेस', 'गोळीबार', 'महात्म्याची स्मृति' अशा कांही कविता मनाला बऱ्या वाटतात. 'वसंतागम', 'प्रणयिनीचा मनोभंग' 'शारदेच्या साम्राज्यांत' यांसारख्या कविता वर्णनात्मक आहेत, तर–'स', 'दे. भ', 'धंद्यांतील धंदे', 'कवितासंन्यास', 'फट–फाजिती' वगैरे कविता विनोदगर्भ आहेत. 'लवंग–वेलदोडे' हा चुटक्यांचा भाग चमत्कृतिप्रधान आहे. पण ह्या कविता पद्यरचनेचे प्रयोग म्हणूनच मनावर परिणाम करतात. कवीची काव्यविषयक दृष्टि एवढी उदात्त असतांना त्याच्या कवितांत हा अ-काव्यात्म गोष्टींचा फापटपसारा पाहून नवल वाटतें आणि शेवटचा 'सुश्लोक वामनाचा' यामधील सूचना पाहून तर तें नवल द्विगुणित होतें :

कांहींसें रमुनी मनीं झिरपुनी रोपें पहा सिंचिलीं
झालों अंकित, राहवे न म्हणुनी ही वाटिका लाविली
येथें त्या सगळ्या कळ्या न दिसल्या सेवी तरी पाकळ्या
त्याही दृष्टिपथांत नाहि पडल्या मार्गा धरी वेगळ्या

तेव्हां या सूचनेप्रमाणें या 'प्रतिबिंबा'च्या फारसें वाटेस न जातां " वेगळा मार्ग धरणें " बरें.

†गुंजन या सौ. उषा सुलाखे यांच्या संग्रहाची गतहि वरच्यासारखीच आहे. त्यांतून या संग्रहांतील पद्यांची रचनाहि तितकीशी नीटस नाही—नवथरपणाचीं चिन्हें जागोजाग आढळतात. मराठींत कांही वर्षांपूर्वी रूढ असलेल्या रम्याद्भुत, रचनाप्रधान भावगीतांची तोंडओळख करून घेतलेल्या कवयित्रीने ही कविता लिहिण्याचा प्रयास चालविला आहे.

---

* प्रतिबिंब—कवि वा. कृ. परांजपे, प्रका०–य. गो. जोशी, ६२३।१५ सदाशिव, पुणें २. मूल्य दोन रु.

† गुंजन—कवयित्री सौ. उषा सुलाखे; प्रका०– दा. ना मोघे, बी. ए., कोल्हापूर एकमेव विक्रेते स्वाधीन साहित्यसंस्था, लि. पुणें २. मूल्य दीड रु.

परंतु त्यांत त्यांना फारसें यश आलेलें नाही. कविता म्हणजे पद्यरचना नव्हे, तेथें भाव–भावनांची उत्कटता लागते, विचारांची खोली हवी असते व त्याशिवाय अभिव्यक्तीची प्रभावी शक्ति पाहिजे असते. अभ्यास, मनन वगैरेंनी यांतील कांही गोष्टी वाढीस लागतील. सौ. सुलाखे यांच्या ठिकाणची ही कवितेची आवड अधिक सुसंस्कृत होऊन निर्माणक्षम झाली म्हणजे खरी कविता त्यांच्या लेखणींतून प्रकट होईल.

सदर्हु संग्रहांतील साधारण बऱ्यापैकीं कवितांत त्यांच्या वर्णनात्मक कवितांचा समावेश करतां येईल. 'गुंजन', 'फुलणी', 'नवोढा' 'माझें घर' 'अरुणोदय', 'चिमण्या', इत्यादि कविता या तऱ्हेच्या आहेत. 'क्रांतीगीत गा'सारख्या कांही कवितांत देशप्रेमाची छटाहि आहे. 'कुणी म्हणोत' व 'देवाच्या दारीं' यांसारख्या कित्येकांत वात्सल्य व कारुण्य यांचा स्पर्श आहे. स्त्रीपुरुषप्रेमाची गीतें, अर्थातच येथेंहि आहेत. परंतु या सर्वांत अत्यंत उत्कट, खोल अशा अनुभूतींचें पडसाद मनाला वेधून घेत नाहीत. शब्दांची मोहनीच अजून राज्य करतांना आढळते. एका होतकरू कवयित्रीचा कवितासंग्रह या दृष्टीने याचें स्वागत करणें उचित होईल.

***प्रभंजन** हा श्री. बाबुलनाथ यांच्या कांही विनोदी व गंभीर कवितांचा संग्रह आहे. हा वानगीदाखल छोटा संग्रह असून पुढें याच नांवाचा मोठा संग्रह प्रसिद्ध होणार असल्याची ग्वाही जाहिरातींत दिलेली आहे. यांतील विनोदी कविताच पाहण्यासारख्या असणार—श्री. बाबुलनाथ या कवीचें आगमनच त्यार्प्रीत्यर्थ झालेलें. पण यांतील कवितांत उत्तम प्रकारचा विनोद नाही कीं विडंबन नाही, केवळ खोडकरपणा आहे. ' कावळ्यास आवाहन ', ' संस्कृतिसंरक्षकांचे संमेलन ' ' नटींचा संप '--' सिनेसृष्टींत आनंदीआनंद ' या कवितांत उपहासाचा प्रयत्न आहे पण त्यांत स्वाभाविकता व अपरिहार्यता नाही, सर्व प्रकार ओढून ताणून चंद्रबळासारखाच आहे. ' हेरंबाची नवलकथा ' अगदींच न पटणारी व हंसूं न आणणारी नवलकथा असून ' पेन्द्यनराची स्मशानयात्रा ' तशीच आहे. ' आजोबा अमुचे गेले ' यांत तर औचित्याची काळजीहि घेतलेली नाही. त्यामुळे कवच हास्याचा विषय बनतो. त्या मानाने त्यांच्या गंभीर कविता अधिक बऱ्या आहेत. ' भगवान बुद्धाची सिंहशय्या ' चांगली आहे. ' विशाल वटवृक्ष ' विशाल सहानुभूतीच्या छटेनें हळुवार आहे. ' नूरजहां आणि बदामाचीं फुलें ' या कवितेंत रम्य काव्यात्मता आहे.

श्री. बाबुलनाथांच्या लेखणीला गंभीर व हळुवार कविता साधत असतांना न पेलणाऱ्या विनोदप्रकाराला त्यांनी आपलें वैशिष्ट्य कां बनवावें समजत नाही. कदाचित मोठ्या संग्रहांत अधिक आकर्षक अशा विनोदप्रधान कविता ते देणार असतील असें जाहिरातीवरून वाटतें. तेव्हांच त्यांचें स्वागत करतां येईल.

* * *

वरील संग्रहांपैकीं कित्येक संग्रहांना प्रास्ताविक लेख किंवा तत्सम मजकूर जोडलेला असून त्यापैकीं कित्येक लेख उल्लेखिण्यासारखे आहेत. विशेषतः आर्द्राला जोडलेली डॉ. ग्रामोपाध्ये यांची ' नवकविता '—विषयक प्रस्तावना मार्मिक, स्वरूपबोधक व गुणग्राहक

* **प्रभंजन**—कवि बाबुलनाथ, पुणें; प्रका०—डॉ. रा. शा. काळे, ' शामसदन ' ६० सोमवार पेठ, पुणें २; मूल्य नाही—खास कविसंमेलनानिमित्त सप्रेम भेट.

आहे. **स्वेदगंगाला** श्री. अनंत काणेकरांची छोटी पण गुणनिदर्शक प्रस्तावना आहे. **छाया** श्री. वि. द. घाटे यांच्या गुणग्राहक पत्रात्मक मजकुरानें नटली आहे. श्री. घाटे यांच्या रसिक व मोहक लेखनशैलीचा प्रत्यय यांत येतो. **पहांटवारा** श्री. आ. रा. देशपांडे ( अनिल ) यांच्या प्रास्ताविकानें सुशोभित झाला आहे. कवीच्या प्रतिभेचा विशेष ( व तिची मर्यादा ) त्यांत चांगल्या सूचित झाल्या आहेत. **गुंजनचें** कौतुक श्री. यशवंत दिनकर पेंढरकरांनीं केलें आहे. त्यांत कवयित्रीला मार्मिक सूचना असून कुलस्त्रिया मोकळेपणाने कविता कां लिहूं शकत नसाव्यात याचा विचार आहे. एकंदरींत प्रस्तावनाकर्त्यांनी कवींचें अवास्तव कौतुक होऊं न देण्याची खबरदारी घेतलेली दिसते व त्याचबरोबर गुणदिग्दर्शन योग्य प्रकारें करण्याची काळजीहि घेतलेली नजरेस येते. प्रस्तावनाकर्त्यांचे वैयक्तिक कलहि पाहण्यासारखे आहेत. प्रो. ग्रामोपाध्ये वस्तुनिष्ठ वास्तववादी नवकवितेचें स्वागत करतात व श्री. काणेकर सामाजिक संघर्षावर प्रकाश पडणाऱ्या पुरोगामी कवितेला आवाहन करतात. श्री. विठ्ठलराव आत्मनिष्ठ, वैयक्तिक, सौंदर्यासक्त भावकाव्य पसंत करतात, तर श्री. अनिल दोन्ही प्रकारच्या उत्कटतेचें स्वागत करतात. श्री. यशवंतांनी अभ्यास व मनन यांची जरूरी काव्यालाहि असते असें आपल्या प्रस्तावनेंत नमूद केलें असलें, तरी सर्वसाधारण व्यक्तीच्या जीवनांतील उत्कट भावतरंगांचें आलेखन हेंच ते काव्याचें उत्कृष्ट गमक समजतात असें दिसतें. अशा तऱ्हेने मराठी कवितेचे व मराठी काव्यमीमांसेचे बहुतेक पैलू या संग्रहांच्या निमित्ताने रसिकांपुढे आले आहेत. 'आधुनिक मराठी कविता' प्रगतिपथावर नाहीं असें मानणारांनी त्या सर्व बहराकडे जरा नीट नजर करावी म्हणजे ती साफ होऊन सुधारेल अशी खूणगांठीची सूचना किती समयोचित होईल हें या संग्रहांच्या वाचनाने कोणालाहि पटेल.

ना. ग. जोशी

**कविता**—( कवि व प्रका० : ना. ग. जोशी; दांडिया बाजार, बडोदें. किं. १ रु. )

'जीवनयोग' या वैशिष्टयपूर्ण प्रदीर्घ काव्याचे लेखक नि एक साक्षेपी टीकाकार श्री. ना. ग. जोशी यांच्या स्फुट कवितांचा हा संग्रह आहे. चालू काळांत काव्यप्रकाशन व काव्यचर्चा यांना बहर आलेला दिसत आहे. महायुद्ध, त्याची समाप्ति, तदनंतरचे अपेक्षाभंग, स्वातंत्र्यप्राप्ति, साम्यवाद, स्वार्थवाद इ. इ. कवीच्या द्रष्टेपणालाहि मागें टाकणाऱ्या अनेक घटना गेल्या कांही वर्षांत घडल्या व घडत आहेत. भावनाशील मनांना प्रत्यहीं 'धक्के' मिळत आहेत नि याचेच पर्यवसान अधिक काव्यनिर्मितींत होत आहे कीं, काय न कळे ! ही काव्यनिर्मिति विपुल आहे इतकेच नव्हे तर ( गुणदृष्टयाहि ) "नवीन" आहे असें कांही टीकाकार म्हणत आहेत. श्री. जोशी यांच्या या संग्रहांत, हा जानेवारी १९४९ मध्यें प्रसिद्ध झाला असला तरी, 'नवकाव्य'सदृश काव्य आढळत नाही, ही प्रथमच लक्षांत येणारी गोष्ट होय. आणि याचें कारण, या कवितांचा लेखनकाळ एक दशकापूर्वीचा आहे. टीपांवरून हें उघड दिसतें कीं, या कविता १९३२ ते १९३९ या अर्धतपाच्या कालखंडांत लिहिल्या गेल्या आहेत. अर्थात् खरी कविता ही जुनी किंवा नवी असण्याआधीं 'कविता' असावी. आणि या दृष्टीनें पाहतां या संग्रहांतील कांही कवितांत बरेचसे कवितागुण आढळून येतात हें नमूद केलें पाहिजे, विशेषतः 'नाट्यात्मक

एकोक्ति' ( Dramatic monologue ) म्हणून काव्यरचनेचा जो एक विशेष प्रयोग केला आहे तो उल्लेखनीय आहे. " माझ्या राजाला नांवं कुणी ठेवूंऽऽ नका ", 'भादव्याची गौर' 'जग म्हणे मारेकरी' या कवितांना 'नाट्यात्मक एकोक्ति' असें कवीने संबोधिलें आहे. यांतील पहिल्या दोन सरस उतरल्या आहेत. काव्यविषयीभूत व्यक्तींच्या मनाचें स्पष्ट दर्शन त्यांत होतें. मात्र या कवितांतील 'गेला बाई, गगनींच्या गंगेमध्यें पोहाया' ही मातेच्या मुखांतील उक्ति किंवा 'पिढी नवीन येतसे इ० प्रौढेच्या तोंडची ( प्रौढ ) पंक्ति स्वाभाविक वाटत नाहीं. एरव्हीं हा 'प्रयोग' यशस्वी व अनुकरणीय आहे. ("My stress lay on the incidents in the development of a soul ") असें ब्राउनिंगने आपल्या ' ड्रॅमॅटिक ' मॉनोलॉग्जविषयीं म्हटलें आहे, या दृष्टीनें आत्म्याचें विश्लेषण वा विकसन दर्शविणाऱ्या एकोक्ति जेवढ्या निर्माण होतील तेवढ्या हव्याच आहेत.

या संग्रहांतील 'परीटाच्या टेंबीवर', 'खळें चंद्राच्या भोंवतीं', 'बोलो विठ्ठल विठ्ठल' इ. कविता उल्लेखनीय आहेत. संग्रहाच्या शेवटीं शेवटीं दिलेलीं प्रणयात्मक गीतें फारशी परिणामकारक वाटत नाहीत. असावी तेवढी उत्कटता त्यांत नाही. कवीच्या वर्णन-शक्तीचा प्रत्यय "सागरीं होडी हाकारिली " या कवितेंत येतो.

अधिकाधिक हिसळे लाट सागरावरी
अधिकाधिक मिसळे मेघ अंबरोदरीं
ठेपली रात्र अंधारि विचारी मनीं होय घाबरी......
तों पहिलें आंसूं हळूच खालीं गळे
भोंवती उसळत्या भुतांस वांछित मिळे
पाकळी जशी ओघळे, गिळाया पाचोळा सळसळे......

इ. ओळींतील शब्दचित्र या संदर्भात पाहण्याजोगें आहे.

सरस भावगीतनिर्मितींत मात्र कवीला यावें तसें यश आलेलें नाही. कोठें त्रुटित-तेमुळे, कोठें झिजलेल्या संकेतांच्या योजनेमुळे, तर कोठे मुळांतच भावनेची उचंबळ कमी असल्यामुळें असें झालें आहे. शब्द व शब्दसंहतीची कांहीं मजेदारच योजना या संग्रहांत आढळते ! 'फिरवीशी कीं लोचना' 'केलीस गे दया दूर' 'मोहुनी', 'चौकोटिपरी' 'पिछाडली', 'उडे विमान भुर भुर' इ. इ.

—(प्रा. ) वि. म. कुलकर्णी.

**शास्त्री दप्तरांतील वेंचे**—( संपादक श्री. चिं. वि. जोशी, राजदप्तरदार. राज-दप्तरखातें बडोदे प्रकाशन, पृ. २१० किं. रु. ३।. )

प्रस्तुत पुस्तकांत इ. स. १७९९-१८३९ या काळांतील शास्त्री दप्तरांतील पत्र-व्यवहारांतील निवडक वेंचे प्रसिद्ध केले आहेत. गंगाधरशास्त्री पटवर्धन हे बडोद्याच्या इंग्रज रेसिडेंन्टकडे मदतनीस म्हणून काम करीत. पुढें इंग्रजांनी त्यास फत्तेसिंग गायकवाडांकडे कंपनीतर्फे मुतालिक नेमलें. प्रस्तुत संग्रहांतील एकूण १०९ पत्रांपैकीं सुमारें ८० पत्रें इ. स. १८०३ ते १८१५ या कालांतील या शास्त्र्यांनी लिहिलेलीं किंवा त्यांना आलेलीं आहेत. गायकवाडांचा व पेशव्यांचा देण्याघेण्याच्या व्यवहाराचा वाद होता. पेशव्यांना भेटून या वादाची सोडवणूक करण्यासाठीं इंग्रजांनी शास्त्र्यांना पुण्यास पाठविलें तेथून ते

पंढरपुरास गेले असतां २० जुलै १८१५ ला त्यांचा खून झाला. या शास्त्र्यांच्या पदरीं यशवंतराव मराठे नांवाचे कारकून होते. त्यांच्या नातवाने प्रस्तुत दप्तर बडोदा सरकारकडे दिलें. इ. स. १८०३–१८ या काळांत बडोद्यास जें राजकारण चाले त्याची कांहीं कल्पना या संग्रहावरून येते. मराठेशाहीच्या या पडत्या काळांत गायकवाडाच्या अनेक मांडलिकांशीं त्यांचे जे व्यवहार चालत त्याबाबत इंग्रजांची समजूत घालावी लागे. या कामीं गंगाधर शास्त्र्याचा फार उपयोग होई. व त्यासाठीं शास्त्र्याचे मुंबईस नित्य जाणें व गव्हर्नरास भेटणें वगैरे उद्योग चालत. या शास्त्र्यांच्यासंबंधीं असलेल्या पत्रांखेरीज दप्तरांत आणखी दोन सुटे कागद सांपडले ते यांत समाविष्ट केले आहेत. खरें म्हटलें तर हे कागद इतर मामुली पत्रव्यवहारापेक्षां फारच वाचनीय आहेत. सातारचा छत्रपति प्रतापसिंह भोसले याच्या स्वाभिमानाची कांहीं चुणुक पेशवे दप्तर भा. ४२ मध्यें पहावयास मिळते. त्याचाच नमुना या पुस्तकांत लेखांक १०८ मध्यें पहावयास मिळतो. हा अपुरा असला तरी साद्यंत वाचण्यासारखा आहे. एकदा हातीं सत्ता आल्यावर इंग्रज कशी जबरदस्ती करीत याचा येथें नमुना पहावयास सांपडतो. मराठेशाहीच्या पडत्या काळांत प्रतापसिंहानें दिलेलीं बाणेदार व चोख उत्तरें वाचलीं म्हणजे मराठ्यांचें राज्य गेलें पण स्वाभिमानाचा पीळ गेला नाहीं याची साक्ष पटते.

या पत्रांतील मराठी भाषा पूर्वीच्या मराठी पत्रांतील भाषेइतकी अपरिचित नाहीं. **फारशी शब्द मागे पडले, इंग्रजीची छाप अजून पडावयाची होती, अशा काळांत निव्वळ मराठी वळणाचे शब्द या पत्रांतून अधिक सांपडतात.**

श्री. जोशी यांनीं या पत्रांचें संपादन रियासतकार सरदेसाई यांनीं पेशवे दप्तरांत घालून दिलेल्या नमुन्यावर केलें आहे. मराठी वाचकांस मूळ जसेच्या तसे वाचावयास मिळावे व इतरास त्याचा इंग्रजीतून सारांश वाचावयास मिळावा, सामान्य वाचकांसाठीं अपरिचित शब्दाचा कोश द्यावा, हें धोरण आहे. त्यास अनुसरून प्रारंभीचे लेखांक, परिचयार्थ संपादकांनी लिहिलेले चार शब्द इंग्रजींत वाचले आहेत. सूचिहि इंग्रजींतच आहे. मराठी येत नसलेल्या वाचकांशीं सहकार्य केल्याखेरीज संशोधनाचें कार्य वाढीस लागणार नाहीं हें आता मनांतून तरी सर्वांस पटतें आहे पण कांहीं झालें तरी मराठी साधन–ग्रंथाची सूचि इंग्रजींत छापणें म्हणजे परभाषेची मराठीवर जबरदस्ती होय. पेशवे दप्तरांत नानासाहेबांनी जें केलें त्याचेंच येथे अनुकरण होत आहे हें खरें, पण पेशवे दप्तराचें संपादन इंग्रजी राज्यांत मुंबई सरकारसाठीं झालें. प्रस्तुतचें हें ग्रंथसंपादन स्वातंत्र्य–कालांत गायकवाड सरकारसाठीं झालेलें आहे. या दृष्टीने संपादकांनी कांहीं तारतम्य दाखविणें जरूर होतें.

१–७–४९ (प्रा.) रा. वि. ओतुरकर

## राष्ट्रभाषा आणि राष्ट्रलिपि म्हणून
# हिंदी भाषा आणि देवनागरी लिपि यांचा पुरस्कार
### महाराष्ट्र–साहित्य–परिषद्, पुणें २

**राष्ट्रभाषा—**

भारतवर्ष स्वतंत्र झाल्यादिवसापासून हिंदवासी लोकांमध्ये काश्मीरपासून कन्याकुमारी- पर्यंत जें चैतन्य उत्पन्न झालें आहे त्याचा सर्वोत प्रभावी आविष्कार हा एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेंत दिसत आहे. हिंदुस्थान हा एक राष्ट्रसमूह आहे, असें म्हणणारे म्हणोत; तथापि भारतांत भिन्न–भिन्न भाषा आणि लिपि असूनसुद्धा राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक आणि आर्थिक दृष्टिकोणांनीं पाहतां भारतवर्षाचें एकराष्ट्रीयत्व हें सुनिश्चित आहे. देशाच्या एखाद्या कोपऱ्यावर जरी कांहीं आपत्ति आली तरी सर्व देशच्या देश तिने लहरून उठतो, यांत ही एकराष्ट्रीयत्वाचीच भावना स्पष्ट दिसते.

अशा प्रकारें भारतवर्ष हें एक राष्ट्र आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. तेव्हा अशा देशाची बोधभाषा एक असणें हें अनेक दृष्टींनी हितावह आणि आवश्यक आहे. एक बोधभाषा स्वीकारण्याने आपला आंतर प्रांतीय व्यवहार अधिक सुकर, खेळीमेळीचा आणि सामरस्याचा होणार आहे; तसेंच, त्यामुळे लोकांमधील एकराष्ट्रीयत्वाची भावनाहि अधिक पुष्ट होऊन जगांतील इतर राष्ट्रांमध्ये या देशाला गौरवाचें स्थान प्राप्त होणार आहे.

कोणी असें विचारतील की, "मग आपण राष्ट्रभाषा म्हणून इंग्रजी भाषेचा आश्रय कां करूं नये?" याला सरळ उत्तर असें आहे की, आमच्या दास्याची संतापजनक स्मृति करून देणारी इंग्रजी भाषा ही आम्हांला 'राष्ट्रभाषा' म्हणून नको. इंग्रजी ही आम्हां भारतीयांना परकी भाषा आहे. अभ्यासाची हौस म्हणून कोणतीहि भाषा शिकण्यास प्रत्यवाय नसला, तरी राष्ट्रभाषेचें गौरवाचें स्थान घेण्यास इंग्रजी भाषा ही अपात्र आहे. इंग्रजांनी राष्ट्रभाषा म्हणून हिंदी भाषा स्वीकारणें हें जितकें विसदृश आहे, तितकेंच भारतीयांनी इंग्रजी भाषा स्वीकारणें हेंहि विसदृश आहे. परदेशस्थ भाषांचा द्वेष करण्याचें आम्हांला मुळींच कारण नाहीं कारण तशी आम्हांला शिकवणच नाहीं; पण आमच्या भाषांचा आम्हांला अधिक अभिमान आहे. इंग्रजीमुळेच प्रांताप्रांतांचे भाषिक संबंध दुरावले आहेत. त्याचप्रमाणे प्रांतभाषांशीं इंग्रजीचा व्याकरणविषयक आणि भाषाविषयक संबंधहि दूरान्वित आणि उपेक्षणीय आहे. याचमुळे इंग्रजी ही सामान्य जनांना शिकण्यास, समजण्यास व व्यवहारास दुर्बोध आणि अत्यंत अडचणीची आहे. या कारणास्तव इंग्रजी भाषेला राष्ट्रभाषेचें स्थान देणें अयुक्त आहे. एवढेंच काय, पण असें करणें हास्यास्पदहि होईल.

राष्ट्रभाषेच्या स्थानावर इंग्रजीचा अधिकार अशा प्रकारें बिलकुल पोहोंचत नाहीं. अर्थात् मग हिंदुस्थानामध्ये ज्या देशी भाषा आज रुढमूल झालेल्या आहेत, नित्याच्या व्यवहारांत आहेत, त्यांतलीच एखादी भाषा हें स्थान घेण्यास पात्र आहे, हें उघड आहे. प्रत्येक प्रांताला आपली भाषा हीच राष्ट्रभाषा व्हावी, अशी आकांक्षा असणें स्वाभाविक

आहे; परंतु म्हणूनच या बाबतींत आपण अत्यंत निर्लेप व निरभिमान रीतीने, देशव्यापक दृष्टिकोणाने आणि समाहित मनाने या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. राष्ट्रभाषेच्या बाबतींत असा विचार करितां आपल्यास सामान्यपणें असा निष्कर्ष काढतां येईल की, देशी भाषांमधील सर्वांना सुगम असलेली, बहुसंख्य लोकांमध्ये अगोदरच प्रचलित असलेली, भाषिक दृष्ट्या इतर देशी भाषांशीं शब्दभांडार व व्याकरण या बाबतींत अधिक संलग्न असलेली व भारतीय संस्कृतीच्या विविध परंपरांची उत्तम वाहक असलेली अशीच देशी भाषा राष्ट्रभाषेच्या सिंहासनावर आरूढ होण्यास पात्र आहे. तसेंच, त्या भाषेमध्ये उच्च आणि सुंदर साहित्य, शास्त्रीय ग्रंथ आणि वैज्ञानिक वाङ्मय निर्माण करण्याचीहि पुरेपूर क्षमता ( Potentiality ) असली पाहिजे.

वर सांगितलेल्या राष्ट्रभाषेच्या निकषाला सर्वोत उत्तम रीतीने उतरणारी भाषा 'हिंदी' हीच आहे. हिंदी ही इतर प्रांतभाषांनाहि जवळची वाटते, याचीं अनेक कारणें आहेत. त्यांतलीं प्रधान कारणें अशीं आहेतः—इतर प्रांतभाषांप्रमाणे हिंदी ही संस्कृतावलंबी भाषा आहे. संस्कृताचें शब्दभांडार लुटून तें आत्मसात् करण्यामध्ये सर्व प्रांतभाषा आणि हिंदी यांचें स्वरूप एकच आहे. हिंदीचें व्याकरण आणि इतर प्रांतभाषांचें व्याकरण बहुशः समान अधिष्ठानावर आहे. उच्चार, वर्णमाला आणि परिभाषा याहि महत्त्वाच्या गोष्टींत हिंदी ही तदितर प्रांतभाषांना निकटवर्ती आहे. सांप्रत शिक्षणाचें माध्यम देशी भाषा होत आहेत, ही भाग्याची गोष्ट आहे. त्यामुळे विविध शास्त्रांत पारिभाषिक शब्दांची निर्मिति होणें हें अत्यावश्यक झालें आहे. अशा प्रकारचे प्रयत्नहि प्रांताप्रांतांमधून उत्साहाने चालू आहेत. अर्थात् ही शास्त्रीय व वैज्ञानिक परिभाषा सार्वभारतीय व्हावयाची असेल तर संस्कृत भाषेच्या टाकसाळींतूनच ती निर्मिली पाहिजे. सर्व देशी भाषांना प्रायः साधारण असलेल्या संस्कृतामुळे प्रांतभाषा आणि हिंदी यांचे संबंध अधिक दृढ आणि प्रेमाचे होतील, यांत संशय नाही. कारण हिंदी हीहि आपल्या परिभाषेसाठी संस्कृतावरच अवलंबून आहे. या विचारावरून हें उघड आहे की, 'हिंदी' हेंच नांव समर्पक आहे. तसेंच, तें प्राचीनतम असल्यामुळें अधिक ग्राह्यहि आहे. 'हिंदुस्तानी' हेंच नांव नवीन आहे.

## राष्ट्रलिपि—

सर्व देशाची राष्ट्रभाषा जशी एक असणें आवश्यक आहे, त्याचप्रमाणें राष्ट्रलिपिहि एक असणें आवश्यक आहे. दोन अथवा तीन राष्ट्रलिपि स्वीकारून त्यांमध्ये गौण–प्रधान–भाव ठेवणें हें अनुचित आहे. शिवाय त्याने राष्ट्रलिपीचा प्रश्न गुंतागुंतीचाहि होण्याचा संभव आहे. यासाठी राष्ट्रलिपि एकमेव असणें सरळ, हिताचें आणि म्हणून आवश्यक आहे. राष्ट्रभाषेप्रमाणेच राष्ट्रलिपीचाहि असा निकष ठरविणें योग्य होईल की, देशातील शिक्षितांना पूर्ण ज्ञात असलेली आणि बहुसंख्य साक्षरांनाहि परिचित असलेली अशीच देशी लिपि ही राष्ट्रलिपि होण्यास पात्र आहे. अशी लिपि 'देवनागरी' ही असल्यामुळे राष्ट्रलिपि होण्यास तीच सर्वथा योग्य आहे.

'देवनागरी' लिपि ही इतरहि अनेक कारणांस्तव स्वीकार्य आहे, हें सहज समजून येईल. शास्त्रतः, उच्चारतः आणि ध्वनिसंकेतांच्या दृष्टीने 'देवनागरी' ही लिपि सर्वोत अधिक निर्दोष व संपूर्ण आहे. संस्कृत आणि प्राकृत यांसारख्या अभिजात भाषांच्या अध्ययन–अध्यापनाला देवनागरी लिपीवांचून दुसरी गति नाही. त्यामुळे देशांतील अखिल विद्वज्जनांना–मग त्यांची प्रांतभाषा कोणतीहि असो–तिचें पूर्ण ज्ञान अगोदरच आहे; परंतु

अन्य किती तरी देशी भाषांना देवनागरी ही अधिक निकटवर्ती आहे. या देशी भाषा जाणणाऱ्या लोकांचें प्रमाण फार मोठें आहे. तेव्हां ' देवनागरी ' ही शास्त्रतः, तारतम्याच्या दृष्टीने आणि सर्व जनतेच्या दृष्टीने सुगम आणि हितप्रद असल्यामुळे तिचा स्वीकार युक्तिवादाला अनुसरूनच आहे.

केंद्रीय शासनव्यवहार आणि प्रांताप्रांतांमधील राजनैतिक व्यवहार हे हिंदी या राष्ट्रभाषेच्या व देवनागरी या लिपीच्याचं द्वारा चालणें इष्ट असल्यामुळे त्यांतहि त्यानाच स्थान असलें पाहिजे. त्या त्या प्रांतांतील सर्व व्यवहार त्या त्या प्रांतभाषांमधून व प्रांतलिपींमधून चालणें हें अनिवार्य असलें तरी राष्ट्रभाषा व राष्ट्रलिपि या नात्यांनी हिंदी व देवनागरी यांचाच स्वीकार आपण करावा.

शिक्षणक्रमामध्ये प्राथमिक शिक्षणापासून सर्वोच्च शिक्षणापर्यंत बोधभाषा म्हणून प्रांतभाषेचें स्थान निर्विवाद आहे. प्रांतभाषांना प्रभावित्व प्राप्त होण्यासाठी त्यांना केव्हांहि उत्तेजन दिलेंच पाहिजे. कारण प्रांतभाषा ह्या त्या त्या प्रांतवासियांच्या साधारणतः मातृभाषा अर्थात् जन्मभाषा असतात. मातृभाषांना मरगळ येऊं देणें अथवा त्यांची उपेक्षा करणें हें अनुचितच आहे. यासाठीं राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा व राष्ट्रलिपि म्हणून देवनागरीचा स्वीकार आम्ही निःसंदिग्ध रीतीने करितों, त्या वेळीं त्या त्या प्रांतांतील भाषा व वाङ्मय यांच्या अभिवृद्धीबाबत यत्किंचितहि उपेक्षा कोणाकडून व्हावी, असा त्याचा मुळीच अर्थ नाहीं. याच धोरणाने महाराष्ट्र-साहित्य-परिषद् ही राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा आणि राष्ट्रलिपि म्हणून देवनागरीचा पुरस्कार करीत आहे.

रा. श्री. जोग
कार्याध्यक्ष,
महाराष्ट्र-साहित्य-परिषद् , पुणें.

---

## दिवंगत डॉ. ग. य. चिटणीस.

दि. २२ ऑगस्ट रोजीं डॉ. चिटणीस यांचें देहावसान झाल्याची शोचनीय वार्ता आता सर्वश्रुत झाली आहे. एक बुद्धिवान वृत्तपत्रकार म्हणून त्यांना सर्व महाराष्ट्र ओळखीत आला आहे. त्यांची रसिकता, त्यांचे संभाषणचातुर्य, मतप्रदर्शनांतील वैचारिकता आणि स्पष्टवक्तेपणा इत्यादि गुणांची ग्वाही देणारें विविध वाङ्मय त्यांनी लिहिलें आहे. तत्त्वज्ञान, सिनेमा, रंगभूमि, राजकारण, आत्मचरित्र, कादंबरी, इत्यादि क्षेत्रांत त्यांच्या लेखणीचा सहज संचार असे. लिलाबाई चिटणीस ह्या त्यांच्या प्रथम पत्नि होत. लीलाबाई त्यांच्या जीवनांतून दूर झाल्यावर कांही काळानें माई वरेरकर ह्यांच्याशीं त्यांचा विवाह झाला. प्रापंचिक सुखदुःखांबद्दल खंत न करतां त्यांनीं आपली जीवनयात्रा संपवली.

'एका संन्याशाचें निर्वाण', 'हा माणूस फार चांगला होता', 'एक थोर आत्मा' अशा गौरवोद्गारांनीं डॉ. चिटणीसांच्या स्मृतीला प्रणामांजलि सादर करण्यांत आले आहेत. ह्या उद्गारांतून त्यांचें व्यक्तिमत्व काय मोलाचें होतें हें कळून येतें. अशा थोर साहित्यिकाच्या निधनाबद्दल 'पत्रिके'स अतिशय दुःख होत आहे. —संपादक

---

# विद्येचा एक दीप मालवला !

This is our master, famous, calm and dead!
—Robert Browning.

सप्टेंबरच्या १६ तारखेस पुणें येथे सायंकाळीं सातच्या सुमारास जो एक दिवा मालवला, त्यामुळे व्याकरण, भाषाशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र, शुद्धलेखन, लिपिसुधारणा, 'ज्ञानेश्वरी'चें अर्थोद्बोधन इत्यादि अनेक विषय कांहीं काळपर्यंत तरी महाराष्ट्रभाषेपुरते अंधारांत चाचपडत राहतील, यांत संशय नाहीं. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकरांच्या निधनानंतर व्याकरणशास्त्राच्या अभ्यासाला जर दुसरा मोठा तडाखा कशाने बसला असेल, तर तो गुरुवर्य **गोविंद कृष्ण मोडक** यांच्या मृत्यूनें होय. भारतीय ज्ञानपरंपरेच्या संकेतांचा विचार करितां 'आचार्य' ही उपाधि चपखल रितीने आणि निर्विवादपणाने ज्या कोणा थोड्या व्यक्तींना लावतां येईल त्यांत कै. मोडक यांची गणना खचितच करावी लागेल. तथापि संकोचशील स्वभावामुळे मोडक स्वतः मात्र 'संस्कृत शिक्षक' एवढीच साधी उपाधि आपल्या नांवापुढे ठेवून विषयाचें प्रतिपादन करीत. संस्कृताच्या ठिकाणीं त्यांची प्रीति होती, भक्ति होती, निष्ठा होती ! मॅट्रिकच्या परीक्षेत जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति मिळविल्यानंतर ते पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूल मध्ये कांहीं काळाने दाखल झाले; आणि येथेच त्यांच्या तीव्र बुद्धिमत्तेची प्रभा सर्वदूर फाकली. व्याकरण, व्युत्पत्ति आणि शुद्धलेखन यांविषयीं त्यांनी केलेल्या अत्यंत साक्षेपी आणि चिकित्सक टिपणांमधून किती तरी ग्रंथांचा आराखडा उत्पन्न झाला. दुर्दैवाने त्यांतले कांहीं ग्रंथ गाभुटले, कांहीं अद्यापि अपक्व स्थितींतच राहिले आहेत आणि कांहीं ते आपल्या समवेत घेऊन गेले. असें असलें तरी 'मराठीचें अंतरंगदर्शन', 'आपटे गाइडचें भाषांतर', यांसारखे त्यांचे ग्रंथ आणि 'ज्ञानेश्वरी', 'मोरोपंत', 'व्युत्पत्तिकोश', 'स्वराघात', 'शुद्धलेखन' इत्यादि विषयांवरील त्यांचे लेख यांवरून त्यांच्या प्रखर बुद्धिमत्तेचा, मूलग्राही विचारसरणीचा, सूक्ष्म युक्तिवादाचा, झुळझुळत्या विनोदबुद्धीचा आणि तेजस्वी प्रतिभेचा उत्कृष्ट प्रत्यय येतो. दृष्टिमांद्य, निद्रानाश, रक्तक्षय इत्यादि विकारांमुळे त्यांची प्रकृति किती तरी वर्षे नरम-गरमच होती; परंतु त्यांची बौद्धिक आणि मानसिक प्रकृति फारच खणखणीत व निकोप होती. विकट श्लोक ते जसे चुटकीसरसे सुगम करीत, तसेच साध्या श्लोकांतूनही ते अकल्पित नवे, भिनतोड मुद्दे काढीत. कै. न. चिं. केळकरांचें पारितोषिक मिळालेला त्यांचा 'मराठीचें अंतरंगदर्शन' हा ग्रंथ या दृष्टीने अभ्यासकांना अत्यंत मननीय झाला आहे. व्याकरणाचा, अर्थापनाचा अथवा व्युत्पत्तीचा कांहीं मुद्दा सार्वजनिक क्षेत्रांत निघाला, आणि मोडक त्या वेळीं आपल्या घरांत मुकाट बसले, असें कधींहि झालें नाहीं. आपल्या घरांतून त्यांनी लहानसाच गुरगुराट केला तरी तो ऐकावा, असेंच विद्वानांना वाटे; कारण नावीन्याची प्रचीती आल्यावांचून ते कधीच तोंड उघडीत नसत. 'मराठी शुद्धलेखना'बाबतचे त्यांचे विचार इतके मूलगामी, तर्कपूत आणि मोठ्या तोलाचे आहेत कीं, या क्षेत्रांतल्या कोणाहि विद्वानाला ते डावलून जातां येणार नाहीं. उच्चारानुसार लेखनाचे ते जबरदस्त पण तर्कनिष्ठ पुरस्कर्ते होते. भाषेच्या सहजप्रवृत्तीचे ते रसिक अभि-

ज्ञात होते. आपल्या तर्काला विरोधी पण पटण्यासारखा असा एखादा जरी क्षुल्लक मुद्दा वा उदाहरण कोणीं सुचविलें तरी ते महिन्या-महिन्याचीं आपलीं कसोशीचीं टिपणें फाडून टाकीत असत. क्षुरधारेसारखी सूक्ष्म बुद्धिमत्ता आणि प्रकाशझोतासारखी प्रतिभा यांच्या बळावर त्यांना कोणताच विषय बिकट वाटत नसे. 'मयूरमंडळां'तील त्यांची उपस्थिति अत्यंत चैतन्यदायक आणि ज्ञानवाहक असे. मराठी, संस्कृत, प्राकृत व इंग्रजी यांचीं व्याकरणें त्यांना करतलामलकवत् होतीं. गुजराती व हिंदी यांच्या व्याकरणासंबंधीं त्यांची धडपड चालू होती. डांगी बोलीसंबंधीं एका प्रबंधाची सिद्धता त्यांनी चालविलेली होती. आणि 'व्युत्पत्तिकोश', डॉ. हर्षे यांची 'ज्ञानदेवी', 'स्वराघात', 'षष्ठी विभक्ति' यांवरचे त्यांचे लेख किती मोलाचे आहेत, याचा 'पत्रिके'च्या वाचकांना अनुभवच आहे.

अलीकडे त्यांचा जीव 'गीता' व 'ज्ञानेश्वरी' यांवर फार जडलेला होता. सत्तरीच्या घरांत आल्यामुळे त्यांचे डोळे जवळ-जवळ निकामी झाले होते; त्या कारणाने 'व्युत्पत्तिकोशा'ची तयारी होऊनहि त्यांना तो कष्टाने बाजूस ठेवावा लागला. म्हणून उपर्युक्त ग्रंथांचें त्यांनी नेटाने व सूक्ष्म अध्ययन चालविलें होतें. त्यांचें 'ज्ञानेश्वरी'चें व्याकरण अत्यंत उद्बोधक आहे. 'गीते'तील त्यांच्या शंका जशा विचारप्रेरक होत्या, तसेच 'ज्ञानेश्वरी'च्या शेकडों ओव्यांचे त्यांचे अर्थ अभिनव आणि स्वीकार्य होते. सान्वय, सार्थ, सटीप 'ज्ञानेश्वरी' प्रकाशित करण्याचा त्यांचा उद्योग अलीकडे चांगलाच चालीला लागला होता; आणि अर्धी-अधिक 'ज्ञानेश्वरी' या प्रकारें त्यांनी लिहूनहि ठेविली आहे. त्यांचे असमाप्त ग्रंथ आणि सर्व परचुरण लेख प्रसिद्ध करावे, अशी त्यांच्या आप्तांना विनंती करणें व त्यांनी ती पतकरणें मराठी साहित्याच्या दृष्टीने वाजवीच आहे. कै. मोडकांचें स्वतःचें म्हणून एक जग होतें; आणि त्यांत ते सदैव रंगले-रमलेले असत. 'काशीस जाऊन एखाद्या आश्रमांत 'कौमुदी'चा चाललेला पाठ सतत ऐकत रहावें' अशी इच्छा त्यांनी मजपाशीं कितीदा तरी व्यक्त केली होती. दुपारीं-तिपारींहि पुस्तकांचा रच भोवताली घालून शुद्ध विद्योपासनेमध्यें ते सदैव निमग्न असत. चर्येनें फिके पण बुद्धीने रसरसलेले, दृष्टीनें मंद पण चिकित्सेने तरतरीत, दिसण्यास तुसड पण वृत्तीने प्रेमळ, वेषाने गबाळ पण वागणुकींत शिस्तीचे, विद्येचे व्यसनी, ज्ञानाचे स्पृहावान् आणि मनाने निगर्वी असे आचार्य मोडक यांनी शाश्वतचा निरोप घेतल्यामुळे व्याकरण, व्युत्पत्ति आणि 'ज्ञानेश्वरी' हीं आज पोरकीं झालीं आहेत, हें निःसंशय खरें आहे.

—अरविंद मंगरूळकर

# — संपादकीय —

## हिंद मासिकाचा लघुकथा स्पर्धा विशेषांक.

नवता, वास्तवता, मनोवगाहन इत्यादींच्या आविष्करणांत गढलेली लेखणी बरेच वेळा शबल विकारांचें उद्दीपन करूं लागते. त्या अनिष्टतेचा संपर्क टाळून, सदभिरुचि, करमणूक, बोध इत्यादि बाबतींवर कटाक्ष ठेवून हिंद मासिक कार्य करीत आहे, त्या मासिकाने लघुकथांची स्पर्धा जाहीर केली होती. त्या स्पर्धेची फलश्रुति म्हणजे हा विशेषांक होय. अर्थात् आपल्या उद्दिष्टाचा परिपोष होईल अशाच कथांची निवड ह्या अंकांत झाली असल्याचें आढळून येईल. ह्या प्रसंगीं मासिकाचें अभिनंदन करून त्याला आम्ही सुयश चिंतितो.

* * *

## श्री. नारायण गोविंद चापेकर यांच्या तैलचित्राचें अनावरण

हा ह्या तिमाहींतील एक गोड समारंभ होय. प्रस्तुत समारंभास नामदार दादासाहेब मावळंकर हे अध्यक्षस्थानीं लाभल्यामुळे समारंभाचा गोडवा द्विगुणित झाला होता.

संस्कृत व मराठी पंडित आणि धर्मशास्त्र व समाजशास्त्र यांचे अभ्यासक व संशोधक म्हणून नानासाहेब मशहूर आहेत. सन १९२७ पासून पुढें दहा वर्षे ते म. सा. परिषदेचे कार्याध्यक्ष होते. कार्यकुशलता, प्रतिष्ठा आणि सौजन्य ह्या त्यांच्या गुणांनी परिषदेला त्या काळांत स्थैर्य लाभलें व महत्व प्राप्त झालें. १९३४ सालीं बडोद्यास भरलेल्या म. सा. संमेलनाचे ते अध्यक्ष होते. अशा थोर कार्यकर्त्या हितचिंतकाचें कृतज्ञतापूर्वक स्मरण परिषदेने करावें व त्या स्मरणाला प्रतिमारूप लाभावें हें समुचितच होय.

प्रतिमेची देणगी चित्रकार रा. सा. प्रा. स. कृ. पिंपळखरे यांनी दिली. परिषद त्यांची आभारी आहे.

थोर थोर मराठी साहित्यिकांच्या प्रतिमा परिषदेने ह्या सभागृहांत सभोंवार लावून प्रत्येक प्रतिमेखालीं थोडक्यांत त्या व्यक्तीचें कार्य नमूद करावें अशी ह्या प्रसंगीं श्री. चापेकर यांनी सूचना केली.

* * *

## कै. गो. कृ. मोडक

दि. १६-९-४९ रोजीं श्री. गो. कृ. मोडक ह्यांचें निधन झाल्याने मराठीची मोठी हानी झाली आहे. पिकलीं पानें गळावयाचींच. पण नवीन पालवी लगेच बहरते. हा निसर्गन्याय विद्वत्तेच्या बाबतींत टाकोटाक अनुभवास येत नाही. मराठी व्याकरण आणि व्युत्पत्ति ह्या शास्त्रांतील श्री. मोडक यांची पारंगतता किती गाढ होती हें पत्रिकेच्या वाचकांना तरी पटवून द्यायला नको. त्यांच्याबद्दल प्रा. मंगरूळकर यांचें स्फुट या अंकांत अन्यत्र आढळेल. ह्या जातिवंत चिकित्सक पंडिताच्या निधनानें दीर्घकाल भरून न येणारी हानी झाली असून, परिषद् आणि पत्रिका यांना अतिशय दुःख होत आहे.

संपादक

---

# परिषद्वार्ता

( चिटणीसांकडून )

**नियामक मंडळावरील नवीन सभासद—** नियामक मंडळाच्या दि. ५-६-४९ रोजीं भरलेल्या सभेंत घ. नि. ११ ( ई ) प्रमाणें पुढील सभासद स्वीकृत करण्यांत आले. प्रा. ना. सी. फडके, श्री. त्र्यं. गं. धनेश्वर, श्री साने गुरुजी, श्री र. के खाडिलकर, श्री. दि. के, बेडेकर, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. चिं. ग. कर्वे, श्री चिंतामणी आपटे, आचार्य स. ज. भागवत व प्रा. कृ. पां. कुलकर्णी. उपाध्यक्षाच्या रिकाम्या असलेल्या जागेवर प्रा. न.र. फाटक याची निवड करण्यांत आली.

**कार्यकारी मंडळाची सभा**—ता. १८।९।४९ रोजीं सभा भरली. श्री. ह. भ. प. त्र्यं. ह. आवटे, गोमंतकांतील प्रसिद्ध साहित्यिक श्री. वा. भा. नाईक, ' भारत ' कार श्री. गो. पु. हेगडे, परिषदेच्या व्याकरणसमितीचे प्रमुख श्री. गो. कृ. मोडक व डॉ. ग. य. चिटणीस याच्या निधनामुळे झालेलें दुःख व्यक्त करण्यांत आलें.

परीक्षा नियुक्तीसंबंधीचे परीक्षासमितीने शिफारस केलेले नियम संमत झाले. कार्यकारी मंडळांत एक जागा रिकामी होती. श्री. गोपीनाथ तळवलकर यांची त्या जागेवर नियुक्ति झाली. मुंबई येथे नोव्हेंबरमधे भरावयाच्या प्राच्यविद्या-परिषदेसाठीं प्रा. रा. शं. वाळिंबे यांची प्रतिनिधी म्हणून नेमणूक झाली.

**नवीन संलग्नसंस्था—** साहित्य सेवा मंडळ ( कऱ्हाड ), साहित्य सेवा मंडळ ( चिपळूण ), भारतीय-भाषाध्ययन-मंदिर, ( नागपूर ) या तीन संस्था परिषदेशीं संलग्न झाल्या आहेत. त्यांना कार्यकारी मंडळाची रीतसर मान्यता मिळाली आहे.

**व्याख्यानें**—परिषदेच्या स्वाध्याय व्याख्यानमालेतर्फे पुढील साहित्यिकांचीं व्याख्यानें झालीं. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे-' महाराष्ट्रांतील व्यक्तित्वविकासाचा इतिहास '. ( कै. वा. म. जोशी स्मृतिदिना दिवशीं २०-७-४९ ). प्रा. रा. शं. वाळिंबे- ' प्राचीन साहित्य आणि ऐतिहासिक टीकेचा दृष्टीकोन' (६-८-४९). डॉ. के. ना. वाटवे- ' केशवसुत आणि क्रांतिरस ' (१३-८-४९). जर्मन महाकवि गटे याच्या २०० व्या जन्मदिनानिमित्त प्रा. रा. शं. वाळिंबे यांचे 'जर्मन महाकवि गटे याचें जीवितकार्य' या विषयावर व्याख्यान (२९-८-४९).

**संयुक्तमहाराष्ट्र पोट समिति तर्फे प्रा. जोग यांचें व्याख्यान**—परिषदेने नेमलेल्या संयुक्त महाराष्ट्र पोट समितीतर्फे कार्याध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग यांचें दि. ३-७-४९ रोजीं 'डांगी बोली' या विषयावर व्याख्यान झालें. व्याख्यानापूर्वी वृत्तपत्र-प्रातिनिधींना या विषयाबाबत एक मुलाखतहि देण्यांत आली. व्याख्यानाचा संपूर्ण गोषवारा 'केसरी' व 'लोकसत्ता' यांतून आला आहेच. मुंबई साहित्य संघामार्फत मुंबई येथेंहि प्रा. जोग यांचें व्याख्यान झालें.

**विमा परिभाषा**—परिषदेच्या परिभाषा चर्चा मंडळाने विमाविषयक परिभाषा तयार केली असून ती छापून झाली आहे. (मूल्य ४ आणे). मंडळाचे कार्यवाह श्री. त्र्यं. गो. ढवळे, प्रा. स. वि. आपटे इत्यादींनी याकामीं खूपच श्रम घेतले. क्षेत्रपायन ( Irrigation ) परिभाषा छापत आहे.

**प्राज्ञ-विशारद वर्ग**—प्राज्ञ-विशारद वर्ग २७ जूनपासून सुरू झाले. दोन्ही वर्गांत अनुक्रमें ९० व ७० विद्यार्थि-विद्यार्थिनी आहेत. प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. न. का. घारपुरे, डॉ. बा. मो. कानिटकर, श्री. प्र. न. जोशी, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. ह. श्री. शेणोलीकर, प्रा. रा. शं वाळिंबे, प्रा. अ. गं मंगरूळकर, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. गं. भा. निरंतर, प्रा. रा. ना. गद्रे यांनीं आजवर अध्यापन केलें. प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. गं. बा. सरदार यांचीं व्याख्यानें वर्गांत व्हावयाचीं आहेत.

**श्री. ना. गो. चापेकर-तैलचित्र अनावरण**—परिषदेचे माजी कार्याध्यक्ष श्री. ना. गो. चापेकर ( बदलापूर ) यांचें तैलचित्र रा. सा. पिंपळखरे यांनी काढून तें परिषदेस अर्पण केलें. या तैलचित्राचा अनावरण समारंभ सोमवार दि. १२।९।४९ रोजीं सायं. ६॥ वाजतां मध्यवर्ति विधिमंडळाचे अध्यक्ष श्री. ग. वा. ऊर्फ दादासाहेब मावळंकर यांचे अध्यक्षतेखाली मोठ्या थाटाने साजरा झाला. या प्रसंगीं रा. सा. पिंपळखरे यांचाहि सत्कार करण्यांत आला.

**प्रकाशन**—फादर स्टीफन्सकृत 'खिस्तपुराण' या ग्रंथाची देवनागरी प्रत प्रा. वा.दा. गोखले तयार करीत आहेत.

**इतर**—दिल्ली येथे ६, ७ ऑगस्ट रोजीं भरलेल्या राष्ट्रभाषा-व्यवस्था-परिषदेसाठी प्रा. अ. गं. मंगरूळकर परिषदेचे प्रतिनिधि म्हणून गेले होते. त्यांनी परिषदेचें पत्रक या परिषदेंत सादर केलें तें अन्यत्र छापलें आहे.

**शाखासभा**—सोलापूर शाखासभेची त्रैवार्षिक निवडणूक दि.२८।८।४९ रोजीं होऊन पुढीलप्रमाणे पदाधिकारी निवडून आले.

**अध्यक्ष**—श्री. बाबूराव जक्कल.

**उपाध्यक्ष**—श्री. द. ब. मुद्गल, श्री. पं. मा. कामतकर.

**कोषाध्यक्ष**—श्री. शं. नी. जामदार.

**चिटणीस**—श्री. शं. गो. पटवर्धन, श्री. शा. ब. कुलकर्णी. शाखासभेतर्फे दर आठवड्यास चर्चा, व्याख्यानें इत्यादि कार्यक्रम होतात.

**सातारा**—शाखासभेचे कार्यवाहत्व पुन्हा श्री. मो. रा. वाळंबे यांचेकडे आलें आहे. सं. कार्यवाह श्री. अ. ग. करंदीकर आहेत.

**परीक्षाकार्य**—कुलाबा जिल्ह्यांत पनवेल, महाड, अलिबाग येथें केंद्रस्थानें आहेत. अलिबाग येथें परिषदेच्या नियामक मंडळाचे सभासद श्री. कृ. के. रहाळकर यांच्या साहाय्याने वर्ग चालविले जातात. खानदेशांतील सांगवी बु॥ येथेंहि शिक्षणप्रसारक मंडळामार्फत हें कार्य होत आहे. ग्रामप्रमुख श्री. त्र्यं. शा. चौधरी, साहित्यविशारद श्री. वि. श्रा. चौधरी व इतर मंडळी या कामांत मोठ्या उत्साहाने भाग घेत आहेत.

दादर येथें ' अमर हिंद मंडळा'मार्फत स्वतंत्र केंद्र उघडण्यांत आलें आहे. वर्गहि नियमित चालतात.

# नवीन सभासद

## तहहयात

१ श्री. भालचंद्र गजानन खांडेकर, १७३ शनिवार, पुणें २
२ श्री. प्रभाकर रामचंद्र सरनोबत, ४७६ शनिवार, पुणें २
३ श्री. श्रीपाद अमृत डांगे, ९ कोहिनूर रस्ता, दादर-मुंबई
४ श्री. रघुनाथ नारायण चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २
५ श्री. गंगाधर बाळकृष्ण गरूड, गरूड बंगला, डे. जिमखाना, पुणें ४
६ श्री. भास्कर विष्णु काळे, ३३४ नारायण, पुणें २
७ श्री. दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर. ५२९ सदाशिव, पुणें २ (ग्रंथदेणगीमुळे)

## साधारण सभासद

१ श्री. धों. वि. पोतनीस, मॉडेल हायस्कूल, बार्शी ( सोलापूर )
२ श्री. रामनाथ केशव काकोडकर, 'राधा-कृष्ण' एक्सटेन्शन, सांगली.
३ श्री. कृ. भा. जोशी, रेल्वे क्वार्टर्स २७, नासिक रोड.
४ श्री. बालशंकर देशपांडे, २ राजगुरु-निवास, पाईपलेन, वाकोला, सांताक्रुझ, मुंबई २५
५ श्री. गणपत वामन रेगे, वेंगुर्ले (रत्नागिरी)
६ श्री. लक्ष्मीकांत भगवंत कुलकर्णी, चौपाटी कारंजा, अहमदनगर.
७ श्री. लिछमनदास दौलतराम गांधी, सिटी लाइन, अहमदनगर.
८ श्री. गणेश शंकर मुळे, खिस्तगल्ली, अहमदनगर
९ सौ. शकुंतला गोविंद रानडे, ४३२१ कोर्ट रोड, अहमदनगर.
१० सौ. मालती मधुकर मालशे, नेहरू चौक, अहमदनगर.
११ श्री. मनोहर विश्वनाथ देवचके, चौपाटी कारंज्याजवळ, अहमदनगर-
१२ श्री. दत्तात्रय बळवंत अकिवाटे, ई वॉर्ड, २ री गल्ली, शाहूपुरी, कोल्हापूर
१३ श्री. अरविंद रामचंद्र किंबे, १३६९ मंगळवार, कोल्हापूर.
१४ श्री. शंकर दत्तात्रय सबनीस, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.
१५ श्री. केशव बनाजी कुलकर्णी, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.
१६ श्री. गोपाळ बाळकृष्ण कुलकर्णी, प्रायव्हेट हायस्कूलसमोर, कोल्हापूर.
१७ श्री. पांडुरंग बापूजी साळुंखे, ४२७ शिवाजी पेठ, कोल्हापूर.
१८ श्री. पंडित नरहर आवळीकर, २९३५ ए वॉर्ड, महाद्वार रोड, कोल्हापूर
१९ श्री. रामचंद्र वासुदेव शेवडे. २२०५ डी, शुक्रवार, कोल्हापूर.
२० श्री. विठ्ठलराव शंकरराव शिंदे, न्यू शाहूपुरी, कोल्हापूर.
२१ श्री. गोपाळ सदाशिव नणदीकर, १२३ सी गुजरी, कोल्हापूर,
२२ श्री. लक्ष्मण विनायक ढवळे, २२७२ मंगळवार, कोल्हापूर
२३ श्री. अनंत कृष्ण ओगले, महाद्वार, कोल्हापूर
२४ श्री. गुंडो सीताराम कुलकर्णी, रविवार पेठ, कोल्हापूर.
२५ श्री. दत्तात्रय बळवंत पार्टे, पो. बॉ. २३, कोल्हापूर.
२६ कु. विमल दत्तात्रय तांबेकर, सहस्रबुद्धे-बंगला, जंगली महाराज रोड, पुणें ४.
२७ श्री. माधव सुदामदेव झणकर, ७४८ कसबा, पुणें २

२८ श्री. श्रीकृष्ण रामचंद्र केतकर, बुरुमतळी, चिपळूण ( रत्नागिरी )
२९ श्री. गंगाबाई सदाशिव भिडे, ८८६ सदाशिव, पुणें २
३० श्री. गोदावरी पुरुषोत्तम गोरे, ५९२ सदाशिव, पुणें २
३१ प्रा. रघुनाथ वासुदेव ठकार, ११३ कँप, बेळगांव.
३२ श्री. बाळकृष्ण रंगराव सुंठणकर. रॉयरोड, ठळकवाडी ( बेळगांव )
३३ प्रा. लक्ष्मण हणमंत टेंगशे, ३६५ ठळकवाडी, ( बेळगांव )
३४ प्रा. यशवन्त.दत्तात्रय भावे, ३१६ ठळकवाडी ( बेळगांव )
३५ श्री. शंकर विनायक जोगळेकर, १६८५ किर्लोस्कर रस्ता, बेळगांव.
३६ श्री. विनायक विश्वनाथ पै, ३४७९ समादेवी गल्ली, बेळगांव.
३७ श्री. अरविंद कृष्ण याळगी, १९७० कडोलकर गल्ली, बेळगांव.

## साभार स्वीकार

१ **सोन्याचे देव ( नाटक )**—ले० नाना जोग; प्रका० पां. रा. ढमढेरे, सदाशिव. पुणें २; मूल्य १॥ रु.

२ **महात्मा गांधी**–ले० गोवर्धन पारीख; प्रतिभा प्रकाशन, जव्हार; मूल्य २ रु.

३ **नाट्यपरामर्ष**—ले० व प्रका० र. कृ. फडके, शिल्पकार, धार; मूल्य ५ रु.

४ **कांचेचें कवच ( कथा )**—ले० रा. भि. जोशी; अभिनव प्रकाशन, नायगांव, मुंबई १४; मूल्य २ रु.

५ **चारित्र्यहीन**—ले० शरश्चंद्र चटर्जी; अनु० भा. वि. वरेरकर; प्रका० अभिनव प्रकाशन, नायगांव, मुंबई १४; मूल्य ६॥ रु.

६ **भावविहार ( कविता )**—कवि वा. गो. मायदेव; सद्भक्ति पब्लिकेशन्स, होमजी स्ट्रीट, मुंबई १; मूल्य १॥ रु.

७ **वश्या म्हणे ( कविता )**—कवि वसंत हजरनीस; पाडुरंग प्रकाशन, लष्कर-ग्वाल्हेर; मूल्य १२ आणे.

८ **बालसंगीत व बालधर्मानुशासन**–ले० बा. बा. कोरगांवकर, प्रका० प्रार्थना समाज, पुणें २; मूल्य १२ आणे.

९ **हिंदी व्याकरण दर्शन**—ले० वि. द. घोटणे, शिक्षा प्रचारिणी प्रकाशन, कोल्हापूर; मूल्य ४ आणे.

१० **आदर्श-जीवन**—ले० पां. द. जाधव, प्रका० दासराम बुकडेपो, कोल्हापूर; मूल्य १ रु.

११ **साधुसंतांच्या कथा**—ले० पां. श्री. टिल्लू; ललिता प्रकाशन, भावबाची वाडी, मुंबई २, मूल्य ८ आणे.

१२ **हादगा (एकांकिका)**—ले० सौ. कुमुदिनी रांगणेकर; प्रका० के. भि. ढवळे, मुंबई ४; मूल्य १० आणे.

१३ **ईशावास्योपनिषद्भाष्य**—ले० व प्रका० शं. रा. राजवाडे, २८६ सदाशिव, पुणें २; मूल्य १५ रु.

१४ **क्रान्ति ( संक्षिप्त आवृत्ति )**—ले० साने गुरुजी; प्रका० द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २; मूल्य १॥ रु.

१५ **अजिता ( कादंबरी )**—ले० सरोजिनी बाबर; प्रका० ग्रामीण प्रकाशन संस्था, भिलवडी ( सातारा ) मूल्य ३॥ रु.

१६ **वातावरणांतील सफर**—ले० प्रा. ना. वा. कोगेकर; अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २ ( स्वाध्यायमाला ) मूल्य ६ आणे.

१७ **सभा पर्व**—( मुक्तेश्वर ) संपा० प्रा. वि. म. कुलकर्णी; प्रका० व्हीनस बुकस्टॉल पुणें २; मूल्य रु. ४॥.

१८ **मराठी साहित्य का इतिहास**—ले० प्रा. ना. वा. गोडबोले, प्रका० गयाप्रसाद अँड सन्स, आग्रा; मूल्य ३ रु.

## ' डांगी ही मराठीचीच बोली '. प्रा. रा. श्री. जोग, एम्. ए.

डांग प्रदेशाची भाषा हा आजकाल एक वादग्रस्त आणि कलहकारण असा विषय होऊन बसला आहे. मुंबई सरकारने याबाबत एक निर्णय केला आहे. तो मराठीस अनुकूल व गुजरातीस प्रतिकूल झाल्याने गुजराती समाजांतील कित्येकांच्या भावना दुखावल्या गेल्या आहेत. हा निर्णय सरकारने दिला तरी तो कोणत्या आधारावर आणि अधिकाराने अशी पृच्छा जाणत्या गुजराती लोकांनीहि चालविली आहे असें दिसतें. गुजरात साहित्य परिषदेने या गोष्टींत विशेष लक्ष घालून डांगी ही गुजरातीचीच बोली आहे असें प्रतिपादन चालविलें आहे असें म्हणतात. सुप्रसिद्ध पंडित ग्रिअर्सन् याने संपादिलेल्या ' भारताच्या भाषिक पाहणी 'मध्ये ( Linguistic Survey of India ) गुजरातीस अनुकूल असा निर्णय पहावयास मिळतो असेंहि सांगण्यांत आलें आहे. या वादांत खरी परिस्थिति काय आहे हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

प्रथमतः ग्रिअर्सन्चें म्हणणें तरी काय आहे तें पाहिलें पाहिजे. डांगी बोलीचा नमुना त्याने आपल्या ' भाषिक पाहणी ' च्या नवव्या खंडाच्या तिसऱ्या भागाच्या २२४ आणि २२५ या पृष्ठांवर दिला आहे. या नमुन्याच्या प्रास्ताविकांत तो म्हणतो :—

The so-called Dangi is almost identical with the current language of Khandesh. ( पृ. २२४ )

( जिला डांगी असें म्हणतात ती जवळजवळ खानदेशाची चालू भाषाच आहे. ) त्याच भागांत खानदेशी बोलीला जें प्रास्ताविक त्याने लिहिलें आहे, त्यांत तो म्हणतो:—

The principal language of the district is, however, a form of speech which shares some characteristic features of Gujarati and in others agrees with Marathi. ( पृ. २०३ )

( या जिल्ह्याची प्रमुख भाषा ही एक अशी बोली आहे की, जिच्यामध्ये गुजरातीचे कांही विशेष आहेत, आणि इतर बाबतींत ती मराठीशीं जुळती आहे. ) या दोनहि विधानांमध्ये डांगी ही गुजरातीची एक बोली आहे असा अर्थ निघत नाही. पहिल्या विधानांत गुजरातीचा निर्देश नाही व दुसऱ्यांत गुजरातीचे कांही विशेष असल्याचें म्हटलें असलें तरी इतर बाबतींत ती मराठीशीं जुळते असें म्हटलें आहे. यांत हे ' कांही विशेष ' संख्येने अधिक आहेत, की या ' इतर बाबती ' अधिक आहेत हें स्पष्ट नाही; पण भाषेच्या झोकावरून ' इतर बाबती ' अधिक असाव्या असें वाटतें. कारण उलट परिस्थिति असती तर 'many characteristic features ( बहुसंख्य किंवा पुष्कळ विशेष ) गुजरातीचे असून in the rest or in the remaining features ( उरलेल्या बाबतींत ) ती मराठीशीं जुळती आहे' असें म्हणावयास कांही हरकत किंवा आशंका ग्रिअर्सनला वाटण्याचें कारण नव्हतें.

परंतु एवढ्याने संपलें नाही; म्हणूनच ग्रिअर्सनचा आधार घेण्यांत येतो. डांगी आणि खानदेशी या बोलींचा समावेश ग्रिअर्सनने ' भिल्ली भाषां ' च्या भागांत केलेला आहे.

मराठीच्या खंडामध्ये ( खंड ७ वा ) तर हा विचार नाहीच, पण गुजरातीच्या भागामध्येहि तो न करतां ' भिल्ली भाषां ' च्या बरोबरच डांगी व खानदेशी भाषांचा विचार त्याने केला आहे. यांतील सामान्य विवेचन अर्थात् भिल्ली भाषांना अनुलक्षून आहे. म्हणजे हा विचार प्रदेशनिष्ठ असण्यापेक्षा समाजसापेक्ष आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. भिल्ल समाजास अनुलक्षून तो आहे. हा समाज उत्तरेस अजमेरपासून तों दक्षिणेस खानदेशच्या दक्षिण हद्दीपर्यंत पसरलेला आहे ठाणें–नाशिक हे जिल्हे या प्रदेशाच्या दक्षिणेस आहेत. भिल्ल समाजाने व्यापिलेल्या या दक्षिणोत्तर पट्टीच्या पूर्वेस व वायव्येस राजस्थानी व पश्चिमेस गुजराती या दोन भाषांचे प्रदेश आहेत. भिल्ली बोलींमध्ये मेवाड, मारवाड, सिरोहि, मही-कांठा, रतलाम, धार, पंचमहाल, झाबुआ, अलीराजपूर, बारवाणी संस्थान, भोपावर एजन्सी, रेवाकांठा, राजपिंपळा, कच्छ, छोटा उदयपूर, सुरत, नवसरी ( बडोदा ), ओलपाड इत्यादि ठिकाणच्या बोलींचा समावेश ग्रिअर्सनने केला आहे, व या सर्व बोलींना सामान्य विवेचन म्हणून जीं विधानें त्याने केलीं आहेत तीं डांगी वा खानदेशी या भाषांपुरतीं नियत नसून वर सांगितलेल्या महाराष्ट्राबाहेरील बहुसंख्य प्रदेशांतील बोलींविषयी आहेत. त्यांत डांग व खानदेश या प्रदेशांचा, त्यांत भिल्ल लोकांची बरीच वस्ती असल्यामुळे, त्याने समावेश केला, व जीं विधानें डांगी किंवा खानदेशीबाबत त्याला स्पष्टपणें करतां आलीं नाहीत, तीं त्याने या सर्वांच्याविषयी बोलतांना करून घेतलीं आहेत. त्यांतून त्याचा गुजराती-विषयीचा अनुकूल भाव स्पष्ट व्यक्त झालेला आहे. तीं विधानें अशीं:—

Among the dialects spoken within the territory sketched above ( या प्रदेशांत येणाऱ्या भागांचा उल्लेख वर केलाच आहे ) there is one, viz, Khan-deshi, which has hitherto been classed as a form of Marathi. The ensuing pages will, however, show on the one side that the so-called Bhil dialects gradually merge into the language of Khandesh, on the other Khandeshi itself is not a Marathi dialect, Several suffixes, it is true, are identical with those used in Marathi. But most suffixes and the inner form of the language more closely agree with the Gujarati and the Rajasthani. ( पृ. १–२ )

( अर्थ :—वर दर्शविलेल्या प्रदेशांत बोलल्या जाणाऱ्या बोलींमध्ये खान-देशी म्हणून जी बोली आहे तिचा समावेश मराठीच्या बोलींमध्ये आतापर्यंत केला जात असे. पुढील पानावरील विवेचनावरून दोन गोष्टी दिसून येतील; एक अशी की, भिल्ली संबोधल्या जाणाऱ्या बोली या हलकेहलके खानदेशच्या बोलींमध्ये मिसळून जातात; दुसरी अशी की, खानदेशी बोली ही बोलीच मुळीं मराठी बोली नव्हे. तीमधील कित्येक प्रत्यय मराठीमधील आहेत हें खरें, पण बहुतेक प्रत्यय आणि भाषेचें अंतःस्वरूप हीं गुजराती आणि राजस्थानी या भाषांशीं अधिक निकटपणें जुळतात. )

या उताऱ्यांतील कांहीं शब्दांच्या योजनेबद्दल नापसंती व्यक्त करतां आली तरी, त्यांतील आशय मराठीला प्रतिकूल व राजस्थानी आणि गुजराती यांना अनुकूल आहे यांत शंका नाही. Several आणि most या शब्दांची योजना केल्याने अर्थ निःसंदिग्ध होत नाही. most (बहुतेक) प्रत्यय असें पुढे म्हणावयाचें होतें तर आधी several म्हटलें नसतें व some चा उपयोग केला असता तर सध्या जी थोडी शंका राहते ती राहिली नसती.

तथापि ग्रिअर्सन्च्या मनांत काय आहे तें समजतें. हेंच तो अधिक स्पष्टपणे पुढे सांगतो. तें असें:—

The northern and eastern dialects connect Gujarati with Rajasthani, while, in the west, there runs a continuous line of dialects southwards towards the broken Marathi dialects of Thana. या पुढील वाक्यें सर्वांत महत्त्वाचीं आहेत. The influence of Marathi increases as we go southwards, and these forms of speech are thus a link between that language ( मराठी ) and Gujarati. This latter language is everywhere the original base, and the gradual approaching the principles of Marathi in structure and inflexional system seems to be due to a secondary development. (पृ. २)

( अर्थ—या ( भिल्ली ) बोलींपैकी उत्तरेकडील आणि पूर्वेकडील बोली या गुजराती आणि राजस्थानी या दोन भाषांमधील दुवे आहेत; पण पश्चिमेकडील प्रदेशांत वरून (उत्तरेकडून) खाली ठाण्याच्या मोडक्या मराठी बोलींपर्यंत ( दक्षिणेपर्यंत ) भिल्ली बोलींची एक अखंड साखळीच आहे. दक्षिणेकडे जसजसे आपण जातों तसतशी मराठीची छाप वाढत जाते; म्हणून या बोली म्हणजे मराठी आणि गुजराती या दोन भाषांमधील दुवे होत. उत्तरोक्त (गुजराती) भाषा मात्र सर्वत्र मूळ आधार आहे, आणि या बोलींतून मराठीची रचना व प्रत्यय-प्रक्रिया जी हळूहळू दिसूं लागते ती नंतरची भर, वाढ आहे असें दिसतें. )

भिल्ली बोलींच्या भागाला लिहिलेल्या आपल्या प्रास्ताविकाच्या शेवटीं ग्रिअर्सन् पुनः एकदा लिहितोः—

The preceding remarks will have shown that the position assigned to the dialects in question is correct, and that, they are, in reality more closely related to Gujarati and Rajasthani than to any other Indo-Aryan vernacular,

[ उपर्युक्त विवेचनावरून हें दिसून आलें असेल की, या बोलींना (भिल्ली बोलींना) जें स्थान (मीं) दिलें आहे तें बरोबर आहे, आणि त्या बोली, खरोखर, आर्यभारतीय देशी भाषांपैकी इतर कोणत्याहि भाषेपेक्षा गुजराती व राजस्थानी या दोन भाषांशींच अधिक निकटत्वाने संबद्ध आहेत. ] ग्रियर्सनची इतरत्रहि वृत्ति अशी की, जेथे जेथे मराठीचे विशेष त्याने मानलेल्या भिल्ली भाषांमध्ये दिसतात तेथे तेथे मूळ भाषेवर मराठीचें आक्रमण झालें आहे, मूळची भाषा मराठी नव्हे असें समजावें. ज्या प्रदेशांविषयी या विशिष्ट भागांत त्याने चर्चा केली आहे, त्याच्या दक्षिणेस खानदेश, डांग, ठाणें हे जिल्हे आहेत. येथील भागांत गुजरातीचे विशेष दिसले तर ते मात्र गुजरातीचे मूळचे होत व मराठीचे विशेष असल्यास ती मराठीची ascendancy होय असें त्याचें मत आहे.

या बाबतींत आणखी एक गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. आपल्या 'भाषिक पाहणी'-मध्ये मराठीचा विचार ग्रियर्सनने सातव्या खंडामध्ये केलेला आहे. त्यावेळीं त्याच्या मताने खानदेशी बोली ही गुजरातीची बोली असल्याने तिचा विचार ९ व्या खंडाच्या दुसऱ्या भागांत करूं असें त्याने सांगितलें. नवव्या खंडापर्यंत आल्यावर त्यास वाटूं लागलें की ती गुजरातीची बोली आहे असें स्पष्ट म्हणतां येणार नाही. तेव्हा गुजराती बोलींच्या विचाराबरोबर

खानदेशीचा विचार न करितां नवव्या खंडाच्या तिसऱ्या भागामध्ये भिल्ली बोलींच्या बरोबर तो केला, व तेथेहि खानदेशीचा आणखी एक उपविभाग करून भिल्ली बोलींपेक्षा निराळा विचार केलेला आहे. म्हणजे तिला स्वतंत्र प्रस्तावना व व्याकरणचर्चा जोडलेली आहे. सारांश, खानदेशी बोलीविषयीचें ग्रियर्सनचें पहिलें मत गुजराती बोलींचा विचार करूं लागतांच त्यास कांही प्रमाणांत का होईना बदलावें लागलें. कदाचित् असेंहि असेल की मराठीचा खंड ग्रियर्सनने स्वतः तयार न करितां डॉ. स्टेन कोनौ यांच्याकडून करवून घेतला, पण त्यांत केलेल्या सर्व विधानांबद्दल आपण जबाबदार असल्याचें जाहीर करून ठेवलें. अधिक विचारांतीं स्टेन कोनौचें मत टिकत नाही असें वाटूनच की काय, गुजरातीबरोबर खानदेशीचा विचार न करितां तो भिल्ली भाषांबरोबर केला, व खानदेशी ही गुजरातीची बोली प्रत्यक्षपणें नसली तरी तिचा मूळ आधार गुजराती आहे; निदान ती मराठीची बोली नाही अशी भूमिका ग्रियर्सनने स्वीकारली, व खानदेशी ही गुजरातीची बोली आहे अशा मूळच्या स्टेन कोनौच्या, पण आपण ज्यास जबाबदार आहोंत असें जाहीर करून ठेवलें, त्या विधानाचा आव राखला. प्रस्तुत विधानें पुढीलप्रमाणें आहेतः—

( अ ) This latter language (खानदेशी) is spoken in the north, on the Khandesh border, where we also find a Bhil dialect. It has hitherto been classed as a dialect of Marathi. The materials collected for the Linguistic Survey, however, show that it is rather a dialect of Gujarati, and *it will therefore be dealt with in connection with that language.* ( *L. S. I. Vol. VII page 43.* )

( आ ) I am indebted to Dr. Sten Konow of Christiania, Norway, for the preparation of this volume. As Editor of the series of volumes of the Linguistic Survey of India, *I am responsible for all statements contained in it.*

ग्रिअर्सनच्या मताचा उपन्यास येथवर झाला व त्याचें मत मराठीला प्रतिकूल आहे हेंहि दिसलें. त्याच्या मताचें परीक्षण यापुढे करावयाचें आहे. सुदैवाने त्याने स्वतः डांगी बोलीचा नमुना खंड ९, भाग ३ मध्ये दिलेला आहे. तोच उतारा येथे परीक्षणार्थ घेणें बरें. इतर उतारे घेतल्यास ते कांही धोरणाने तयार करून घेतले असल्याचा संशय किंवा आक्षेप यावयाचा. ग्रिअर्सनने दिलेला नमुना १९०७ साली प्रसिद्ध झालेला आहे. त्यावेळीं डांगीचा वादहि निर्माण झालेला नव्हता. किंबहुना ग्रिअर्सनच्या मतामुळेच त्याला एवढा जोर चढला आहे. तेव्हा ज्याच्या विधानामुळे मराठीस प्रतिकूल अशी भूमिका निर्माण झाली, त्याचाच उतारा घेतल्याने वर उल्लेखिलेला संशय किंवा आक्षेप येण्याचें कारण नाही. ग्रियर्सनने आणखी एक सोय करून ठेवली आहे. एकच उतारा घेऊन त्याचींच अनेक भाषांत किंवा बोलींत रूपांतरें करवून घेऊन ते उतारे निरनिराळ्या भाषांचे किंवा बोलींचे नमुने म्हणून त्याने दिले आहेत. असे गुजरातीच्या निरानिराळ्या बोलींतील तर्जुमे त्याने 'भाषिक पाहणी'च्या ९ व्या खंडाच्या दुसऱ्या भागांत दिले असून मराठीच्या बोलींचे तर्जुमे त्यांच्या इंग्रजी भाषांतरासह व रोमन लिपीमध्ये सातव्या खंडामध्ये दिले आहेत. त्यामुळे डांगी बोलीची तुलना **एकीकडे गुजरातीशीं व दुसरीकडे मराठीशीं** करणें सुकर झालें आहे.

डांगी बोलींतील नमुना पुढे दिल्याप्रमाणे आहे:—"कोणता–येक गोहाला दोन पोँसा व्हताता त्याहून लाहाना पोँसा बाँसला म्हणु लागना, बा, जी आपली आमदानीना वाटा देणा व्हवा तो माला दे । मंग बाँसने त्यासला आपली आमदानी वाटी दीधी । मंग थोडाच दिवसमा लाहाना पोँसा आपली वाटानी आमदानी सगळी गोळा–करीसनी येखांदी मुलुख–वर निंधी गया । तठे उधाळपणा–खाल वागना, व आपनी आमदानी सगळी पण कुल उडवी टाकी । त्यापासन सगळ खर्ची गया । मंग त्या मुलुख-वर मोठा काळ पडा । त्यापासीन त्याला मोठी येला पडी । मंग तो त्या मुलुखमा येक गोहो–पान जाई रहीना । त्या गोहोनी त्याले आपना डुकरा चारूला खेतमा लावा । तठ डुकरा जी काही खात त खाईसन पेट भरवा असी तेनी मनमा वना व कोनी कांही त्याले दीधा नही । मंग तो सुद–वर आणा, व मनमा म्हणाले लागा, मना बाँसना घर मोलकरी गोहोसले कशा पोटभर भाकरी मिळतीस व मा ते भुक्या मरस । मा आता मना बाँसना घर जाईन, व त्याले म्हणसु अरे मना बाँस मी देवना समोर व तुना समोर मोठा पाप कया. मा तुना पोँसा काँई नई । पण माले तुना येखांदा मजुरकरा–सारखा राख । असा मनमा ईच्यार करीसनी बाँस–कडे गया । तवढामझार तो दुरतीन देखताच बाँसला मया आनी आनी त्यानी जाईसनी पोँसाना गळाला बीलगी पडा, व त्याना गुरळा लीधा । तवळ तो पोँसा म्हनुला लागणा, बाँस, मी देवना समोर व तुना समोर मोठा पाप करना । आता मा तुना पोँसा नही । मंग बाँसनी आपना एक कमाराला सांगा की, घरमां काँई कांडा कोंडा व्हवा तर त्याला खावाला दे । व हातमा येखांदी मुदी व पायमा पायतन व्हवा तो घाली दे । मंग आपण मजा करु । हाऊ मना पोँसा मरी गयेल व फीरसनी जीवत जाया व दवडेल तो सापडना । तवळ मजा करु बी लगनात ।

तवळ तेना वडील पोँसा खेतमा व्हता । तो घर–कडे येवाले लागा । तदळ त्याले काई वाजा व नाच ऐकु आना । तदळ मजुरकर–पयकी येक जणला तो इचारु बी लगणा, हाई गमंत कसानी ह. । तवळ मजुरकरनी त्याळे सांगा की तुना भाऊ वना-ह आनी तो बाँसला सुखे–मनमाने येई मीलना म्हनीसनी बाँसनी मोठी जेवनावळ कई । तवळ तो रागे भरना व घरमा काईँ जाई–ना । मंग तेना बाँस त्याले बाहेर येईसनी समजावाले लागा । पण त्याने बाँसला सांगा की, मी इतला दिवस तुनी चाकरी करीसनी तु सांगेल तस्या ऐका कधी तुना सबद मोडा नही । माले मना सेजास–बरोबर कधी सलगी करू दीधी नही । आनी त्यानी तुनी सगळी दौलत कळवांतीना घर नासी टाकी । तो हा तुना पोँसा वना तवल त्यासाठीँ मोठी जेवनावळ कई । तवळ बाँस त्याला म्हणु लागा की, तु मना–जवळ नेहमीं व्हतास, व हाई सगळी आमदानी तुनीच से । पन आपन सगळा मीळसनी मजा करु । कारण हाऊ तुना भाऊ मरी गयेल तो फीरीसनी जीवत जाया व दवडेल तो साँपडना ।"

वर दिलेल्या उताऱ्यावरून डांगी बोली 'हें एक भाषासंकराचें उदाहरण आहे या-विषयी मतभेद होण्यास जागा दिसत नाही. फक्त या संकरामध्येहि कोणत्या भाषेचें प्रमाण अधिक आहे, एवढेंच नव्हे तर कोणती भाषा मूळ आधार आणि कोणत्या भाषेचें तिज-वर आक्रमण झालें हें ठरविणें प्राप्तच होतें. याबाबत अधिक प्रमाण कोणत्या भाषेचें तें ठरविण्यास उच्चारविशेष, शब्दसंग्रहांतील शब्दांचें प्रमाण, विभक्ति व आख्यातें यांचे प्रत्यय इत्यादि

तपशील पाहून त्यांत तरतम, न्यूनाधिक्य पाहणें आवश्यक आहे. पण मूळ आधार कोणता तें ठरविण्यास उपयुक्त असे इतर कांही सिद्धांत आपल्यास मिळण्याजोगे आहेत. त्यांवरून डांगीचा मूळ आधार ( original base ) असणारी भाषा कोणती तें समजतें का तें आपण प्रथम पाहूं व नंतर वर उल्लेखिलेल्या विशेषांचें प्रमाण काय आहे हें पाहूं.

भाषासंकरामध्ये एखादी मूळ भाषा परकीय भाषेंतील कोणत्या प्रकारचे शब्द उचलते व कोणत्या प्रकारचे उचलीत नाही याविषयी भाषाशास्त्रज्ञांचे कांही ठोकताळे आहेत. ते प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ जेस्पर्सन याने आपल्या Language, its nature, development and origin या ग्रंथांत पुढीलप्रमाणे दिले आहेत.

(1) It is rare for a language to take such words as numerals from another language. ( पृ. २११ )

(संख्यावाचक शब्दांसारखे शब्द एक भाषा दुसऱ्या भाषेपासून क्वचितच उसने घेते. )

(2) Prepositions, too, are rarely borrowed by one language from another ( पृ. २११ )

( प्रेप्रोझिशनें सुद्धा एक भाषा दुसरीकडून क्वचित् घेते—मराठीमध्ये प्रेपोझिशनांचें काम शब्दयोगी अव्ययें करतात तेव्हा येथे त्यांचा अर्थ शब्दयोगी अव्ययें। असा घेणें उचित होईल. )

(3) Personal and demonstrative pronouns, articles and the like are scarcely ever taken from one language by another. They are so definitely woven into the innermost texture of a language that no one would think of giving them up however much he might like to adorn his speech with words from a foreign source. ( पृ. २१२ )

( पुरुषवाचक सर्वनामें, दर्शक सर्वनामें, आर्टिकल्स् आणि तत्सदृश शब्द एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत क्वचितच जातात. भाषेची खास वीण असें जिला म्हणतां येईल, तीमध्ये हे शब्द इतके एकजीव झालेले असतात की, एखाद्याला परकीय शब्दांनी आपलें भाषण सजविण्याची कितीहि हौस असली तरी तो आपले हे शब्द सोडावयाचा विचार मनांत आणणार नाही. )

या सर्व विधानांस एकत्र बांधणारें एक सामान्य विधान जेस्पर्सनने केलें आहे.

It is quite natural that there should be a much greater inclination everywhere to borrow 'full words' (Substantives, adjectives, notional verbs) than 'empty' words (Pronouns, Prepositions, Conjunctions, auxiliary verbs. ( पृ. २११ )

( भाषेंतील 'भरीव' शब्द [ नामें, विशेषणें, मुख्य क्रियावाचक पद ] हे दुसऱ्या भाषेंतून घेण्याची प्रवृत्ति त्या दुसऱ्या भाषेंतील 'पोकळ' शब्द [ सर्वनामें, प्रेपोझिशन्स, सहाय क्रियापदें ] घेण्यापेक्षा बरीच अधिक प्रमाणांत असावी हें साहजिक आहे. )

जेस्पर्सनचीं हीं विधानें म्हणजे मूळ भाषा कोणती व नंतरचें आक्रमण कोणाचें हें ठरविण्याची एक उत्तम कसोटीच होय. भाषाशास्त्रांतलि सिद्धान्त हे क्वचितच निरपवाद असतात हें लक्षांत घेऊनहि असें म्हणतां येईल की, जेस्पर्सनने उल्लेखिलेल्या सर्व शब्द-

जातींची छाननी करून जर असें आढळून आलें की या शब्दांपैकी बहुसंख्य शब्द एका विशिष्ट भाषेमध्येच रूढ असून दुसऱ्या भाषेंत ते रूढ दिसत नाहीत, तर पहिली भाषाच त्या संकीर्ण भाषेचें मूळ मानावयास पाहिजे. जेस्पर्सन हा आज एक सर्वमान्य असा भाषाशास्त्रज्ञ आहे. त्याची ही विचारसरणीहि मान्य व्हावयास प्रत्यवाय नसावा. या दृष्टीने आपल्यापुढे असणाऱ्या डांगी उताऱ्याचें परीक्षण केल्यास काय निष्पन्न होतें तें पाहूं.

( १ ) प्रथमतः उभयान्वयी अव्ययें घेऊं. प्रस्तुत उताऱ्यांत पुढील उभयान्वयी अव्ययें आलीं आहेत. ( १ ) की ( २ ) पण ( ३ ) कारण ( ४ ) आनी ( णि ) आणि ( ५ ) व 'की' हें गुजरातींत 'के' अशा रूपांत येतें. मराठीमध्ये 'की' या रूपांतच आहे. 'पण' हा शब्द प्रस्तुत उताऱ्यांत उभयान्वयी अव्ययाप्रमाणे दोनदा योजला आहे व एकदा योजलेला नाही. 'सगळी' व 'कुल' या एकाच अर्थाच्या दोन शब्दांत तो वाक्यालंकाराप्रमाणे विशेष अर्थ न देतां योजण्यांत आला आहे. दुसऱ्या ठिकाणीं मात्र उभयान्वयी अव्ययाप्रमाणेच योजला आहे. 'कारण' हें उभयान्वयी अव्यय दोन्ही भाषांत संस्कृतमधून आलेलें दिसतें. 'आनी' हा 'आणि' या मराठीचाच विकार आहे. ग्रिअर्सनने दिलेल्या गुजराती उताऱ्यांत 'आणि' चें ईकारान्त रूप कोठेहि नाहीं. अने, ने अशीं एकार किंवा नेकार यांनी युक्त रूपें आहेत. 'व' हें उभयान्वयी अव्यय प्रस्तुत उताऱ्यांत १६ वेळा आलें आहे. गुजराती उताऱ्यांत 'व' मुळीच आलेला नाहीं. मराठीमध्ये 'व' चें अस्तित्व शिवकालापासून आहे. डांगीमध्ये तें आहे याचा अर्थ तें मूळचेंच तेथे आहे. गुजराती आज जसा 'व' शिवायच व्यवहार करीत आहे, तसा डांगी जर तिचा प्रकार असता तर तिलाहि करतां आला असता. उलट तिचें मूळ मराठी मानल्याने 'व' चा जो एवढा उपयोग होत आहे त्याचा सरळ उलगडा होतो. मूळचीं क्रियाविशेषणें, पण आता उभयान्वयी अव्ययांसारखा उपयोग होतो असे आणखी कांही शब्द या उताऱ्यांत आहेत. उदा. 'मंग', 'आता' हे शब्द. 'मंग' एकंदर आठ वेळा आला असून प्रमाण मराठीमधील 'मग'चें तें रूप आहे. 'आता' शब्दहि प्रमाण मराठीमधील आहे. तो दोन वेळा आला आहे. तो उभयान्वयी अव्यय न मानतां आला. तरी 'पोकळ' शब्द मानावयास हरकत नाही. हे दोनहि शब्द गुजराती उताऱ्यामध्ये नाहीत. ते तेथे येण्याचा संभव नव्हता असें नाही. कारण मूळ गोष्ट व तिचा अर्थ दोन्हीकडे अगदी सारखा आहे. याशिवाय तवळ (त्यावेळीं) तठ-ठे ( तेथे ) हे 'पोकळ' म्हणतां येतील असे शब्दहि मराठीला जवळ असणारे असे आहेत. 'म्हणून' या अर्थाचा 'म्हणीसनी' शब्दहि मराठी मूळ असणारा आहे. या सर्व म्हणजे आठ शब्दांत 'पण' व 'कारण' खेरीज इतर शब्द मराठीच दिसावेत व ग्रिअर्सननेच दिलेल्या बहुतेक गुजरातीच्या उताऱ्यांतून दिसू नयेत, आणि 'पण' व 'कारण' हेहि मराठींत असावेत याचा निष्कर्ष असा निघतो की डांगीमधील सर्व उभयान्वयी अव्ययें किंवा तत्सदृश शब्द हे मराठी आहेत. असे शब्द भाषा दुसरीकडून क्वचितच घेते हें मान्य असलें की मग पुढील निष्कर्ष स्पष्ट आहे व तो मराठीस अनुकूल आहे.

( २ ) आता संख्यावाचक शब्द घेऊं. प्रस्तुत उताऱ्यांत 'येक' आणि 'दोन' हे संख्यावाचक आणि 'येखांदी' हा क्रमवाचक असे तीन शब्द आले आहेत. 'दोन' हें रूप गुजरातीच्या कोणत्याहि उताऱ्यांत नाही, अगदी मुंबईच्या उताऱ्यांत सुद्धा नाही. किंबहुना Bloch साहेबांच्या मताने दोन हें नकारयुक्त रूप केवळ मराठीमध्येच आता राहिलेलें आहे. डांग लोकांनाहि 'बे' हें गुजराती रूप सोडून दोन या रूपाचा स्वीकार

करण्याचें विशेष कारण नाही. कारण हा संख्यावाचक शब्द आहे. 'येक' हें रूपहि मराठी आहे. गुजरातींत सर्वत्र 'य' कारविरहित रूप आहे. 'य' कार हा द्राविडी भाषेचा परिणाम मानला जातो. तो मराठीच्या कोंकणी, कोळी, वऱ्हाडी रूपांत व ज्ञानेश्वरी भाषेंतहि आहे. तोच डांगीमध्ये दिसतो. 'येखांदी' या क्रमवाचक शब्दांतहि हा यकार आहे. तेव्हा हे शब्द मराठीवर आधारलेले होत असें निष्पन्न होतें. संख्यावाचक शब्दांची साक्षहि मराठीस अनुकूल पडते.

याबाबत ग्रिअर्सनची कबूली पुढे दिल्याप्रमाणे आहे:—

The numerals are formed as in Marathi. (Page 206, Vol. IX, Part 3.)

### शब्दयोगी अव्ययें

( ३ ) इंग्रजीमधील प्रेपोझिशन्सचें कार्य करणारे बरेच शब्द प्रस्तुत डांगीच्या उताऱ्यांत आलेले आहेत. ( १ ) सारखा ( २ ) जवळ ( ३ ) समोर ( ४ ) कडे ( ५ ) साठीं ( ६ ) बरोबर ( ७ ) पैकी ( ८ ) वर ( ९ ) खाल ( १० ) पान ( ११ ) मझार हे ते शब्द होत. यांपैकी पहिल्या सात अव्ययांचा उपयोग प्रस्तुत उताऱ्यांत प्रमाण मराठीप्रमाणेच केला आहे, व गुजरातीमधील कोणत्याहि उताऱ्यांत हीं अव्ययें नाहीत. 'वर' व 'खाल' यांचा उपयोग मराठीमध्ये 'मुलखावर' व 'उधळपणाखालीं' अशा प्रकाराने आजहि होतो. पान व —मझार यांपैकी—मझार याचा माझारीं या जुन्या मराठी अव्ययाशीं संबंध स्पष्ट आहे. 'पान' चाहि जुन्या मराठीमधील 'वें' शी अर्थदृष्ट्या व उच्चार—दृष्ट्या संबंध दिसतो. या इतक्या शब्दयोगी अव्ययांपैकी 'समोर'ला जवळ येणारें 'सामे' असें एकच गुजराती रूप दिसतें. तथापि समोर शब्द मराठी असल्याबद्दल शंका घ्यावयास नको 'वर' या शब्दयोगी अव्ययाचा मराठी अथवा डांगी उताऱ्यांतील 'मुलखावर' या स्वरूपाचा प्रयोग गुजराती उताऱ्यांतील मुंबई-च्या फक्त दोन बोलींत असलेला दिसतो. बाकी सर्वच अव्ययें मराठीमधीलच डांगीमध्ये आलीं आहेत असें म्हणतां येईल. शब्दयोगी-अव्ययांची साक्षहि याप्रमाणे फारच मोठ्या प्रमाणांत मराठी आधाराच्या बाजूने पडत आहे.

( ४ ) आता पुरुषवाचक सर्वनामें व दर्शक सर्वनामें यांची साक्ष काय पडते तें पाहूं. प्रथम पुरुषाचें सर्वनाम गुजरातींत एकवचनांत 'हुं' आहे. तें गुजरातीने मुंबई बेटांतहि 'हुं' च ठेवलें आहे. डांगी ही गुजरातीवर आधारलेली असती तर 'हुं' सोडून मी, मा हीं रूपें तिला घेण्याचें कारण नव्हतें. द्वितीयपुरुषी 'तूं' हें सर्वनाम गुजराती 'तुं' या सर्वनामाशीं जुळतें आहे. पण गुजरातीचीं इतर विभक्तीचीं रूपें 'तु' युक्त क्वचित् आहेत. बहुधा त्यांतील 'तु'कार जाऊन त्या ठिकाणीं 'त' कार किंवा 'ता' कार आला आहे. डांगीने मात्र 'तु' कार कोणत्याहि विभक्तींत सोडला नाहीं. हें जेरपर्सनच्या विधानाला धरूनच झालें. मात्र तिचा आधार मराठी धरावयास हवा. 'तो' हें तृतीयपुरुषवाचक सर्वनाम एकंदर १३ वेळा मराठी रूपांतच आलें आहे. 'तो' व 'हा' हीं डांगीने कायम ठेवलेलीं दर्शक सर्वनामें, गुजराती 'ते' व 'आ' पेक्षा निराळीं आहेत, व मराठीशीं सर्वस्वी जुळतात हें तर स्पष्ट आहे. पण या दर्शक आणि 'जो' यांसंबंधी सर्वनामाच्या बाबतींत आणखी एक अर्थपूर्ण घटना डांगींत दिसून येते ती अशी. गुजरातींत या तीनहि सर्वनामांचीं तिन्हीं लिंगीं एकच विभक्ति-रूपें निरनिराळ्या विभक्तींमध्ये होतात. मराठीमध्ये तिन्ही लिंगीं भिन्न भिन्न होतात.

डांगीने मराठीचा हा स्वभाव सोडलेला नाही. तो (पु.), त (न.), हा (पु.), हाई (स्त्री.), जी (स्त्री.) हीं रूपें डांगीच्या प्रस्तुत उताऱ्यांतच दिसून येतात. ह्याचा अर्थ असा की, गुजरातीने लिंगमूलक भेद करण्याचें या सर्वनामांच्या बाबतींत सोडून दिलें. ही एकदा घेतलेली सवलत सोडून परत तीन वेगवेगळ्या प्रकारचीं रूपें करण्याचा खटाटोप कोणतीहि बोली किंवा ती बोलणारे लोक यांनी करणें ही गोष्ट दुरापास्त आहे. तेव्हा डांगीने तें मराठीकडून नव्याने स्वीकारलें असें नसून मूळांतून जें चालत आलें आहे तें सोडलें नाही एवढाच याचा अर्थ आहे. 'आपण' या आत्मवाचक सर्वनामाच्या बाबतींतहि हा लिंगभेद डांगीने कायम राखला आहे. आपली (स्त्री.), आपना (पु.) हीं रूपें हा लिंगभेदच दर्शवीत आहेत असे नसून या सर्वनामांचें पष्ठीचें रूपहि गुजराती नसून मराठीच आहे असेंहि सांगत आहेत.

याबाबत ग्रिअर्सनची मान्यता पुढीलप्रमाणे आहे—

The personal pronouns are mainly the same as in Marathi.

The pronouns तो- that, हे and जो (which) have three genders as in Marathi. (Page 206, vol. ix, Part 3.)

(५) जेस्पर्सनने निर्देशिलेल्या आणखी एका प्रकारच्या 'पोकळ' शब्दांचा परामर्श अद्यापि घ्यावयाचा आहे. ते शब्द म्हणजे सहाय क्रियापदें होत. डांगीच्या उताऱ्यांत पुढील सहाय-क्रियापदें अथवा धातु आले आहेत. लाग (म्हणु लागना), टाक (उडवी टाकी, नासी टाकी), दे (करु दीधी, वाटी दीधी), राह (जाई रहीना), पड (बोलगी पडा). यांपैकी लाग, टाक, दे हे धातु मराठीमध्ये आजहि वापरले जात आहेत. राह, पड, हे वऱ्हाडी-नागपुरी बोलींमधून दिसतात व हिंदीच्या संबंधामुळे मराठींत दृढ झालेले दिसतात. टाक हा सहाय धातु गुजराती उताऱ्यांतून आलेला नाही. तो मराठीने कानडीपासून घेतला असें म्हणतात. डांगीने तो कायम राखला असें दिसतें. लाग धातूचा उपयोगहि डांगीने बऱ्याच प्रमाणांत केला आहे; पण गुजरातीच्या उताऱ्यांतून एखाद्यामध्ये व तोहि एखाद वेळेलाच वापरलेला दिसला. दे, रह, पड हे धातु दोन्ही भाषांस समान असल्याने कोणी कोणापासून घेतलें हा प्रश्नच निघूं शकत नाही. ('निघी गया' या डांगी प्रयोगांत 'जा' धातूचा उपयोग सहाय धातूसारखा केला आहे. गुजरातीच्या कोणत्याहि उताऱ्यांत निघणें या क्रियापदाचा उपयोग आलेला नाही. नुसत्या 'गया-यो' या पदाचा उपयोग केला आहे.) मराठी हा डांगीचा मूळ आधार आहे असें म्हटलें की, या सर्व सहायधातूंचा अन्वय स्वाभाविकपणें लागतो. मूळ गुजराती आहे असें समजल्यास भाषांच्या स्वभावास विरोधी असें कांही घडलें असें म्हणावें लागतें.

जेस्पर्सनने ज्या शब्दप्रकारांचा उल्लेख 'विनिमयास विरोधी', 'ऋण म्हणून घेतले न जाणारे' असा केला आहे, त्या सर्व शब्दप्रकारांची साक्ष फार मोठ्या प्रमाणांत बहुतांशीं मराठीस अनुकूल आणि गुजरातीस तर त्याहून अधिक अंशांनी प्रतिकूल अशी पडते हें वरील विवेचनावरून दिसून आलेंच असेल.

एवढ्यानेच खरोखर या प्रश्नाचा निर्णय लागावा. पण गुजराती लोकांचा भर ज्या विभक्तिप्रत्ययांवर आणि आख्यातप्रत्ययांवर आहे त्यांचा परामर्श घेऊनहि मराठीचा आधार उडवून लावतां येणार नाही हें पाहिलें की हा निर्णय अधिक बळकट होईल.

( १ ) प्रथम नामविभक्तीच घेऊं. यांत हें लक्षांत घेतलें पाहिजे की, प्रत्यय एका बोलींतून दुसऱ्या बोलींत गेले आहेत व जातात. डांगीमध्ये नामांच्या षष्ठीचा आणि सप्तमीचा असे दोन विभक्तींचे प्रत्यय गुजरातीचे बहुतेक सरसकट आले आहेत. पण पंचमी, चतुर्थी, (म्हणून द्वितीया), आणि तृतीया अशा चार, निदान तीन विभक्ति यांचे प्रत्यय मराठीच आहेत. तृतीयेचा प्रत्यय दोनहि भाषांत एकवचनांत सारखा दिसला तरी अनेक वचनांत तो एक नाही, व दोन्ही वचनीं एकच प्रत्यय वापरण्याच्या बुद्धीने डांगी लोकांनी मराठीचाच नी हा प्रत्यय घेऊन गोहोनी, मजुरकरनी, त्यांनी असा प्रयोग एक वचनांतहि केलेला दिसतो आहे. यांत मूळ गुजरातीने आपला अनेकवचनी प्रत्यय सोडून मराठीचा अनेकवचनी प्रत्यय घेऊन तो एकवचनी वापरावयास आरंभ केला असें म्हणण्यापेक्षा मूळ मराठीनेच अनेकवचनी प्रत्यय दोन्ही वचनी चालविला म्हणणे हें अधिक लाघवाचें आहे. सर्वनामाचे प्रत्यय पाहिले तर ऋण कोणाचें कोणी घेतलें व मूळ कोणतें यावर अधिक प्रकाश पडेल. प्रथमपुरुषी व द्वितीयपुरुषी सर्वनामें भी (हुं) व तूं (तुं) यांचीं षष्ठीचीं रूपें मारो-री-रुं व तारो-री-रुं अशीं गुजरातींत होतात. तेथे त्यांचा नामांचा ना प्रत्यय येत नाही. कारण सर्वनामे नामांचे विभक्तिनियम अनेक वेळा पाळीत नाहीत. मराठींतहि चा-ची-चें ऐवजी झा- झी-झें हे प्रत्यय या सर्व-नामांच्या बाबतींत दिसतात. डांगीचें मूळ गुजराती असतें तर याबाबत कांही फरक करण्याचें कारण तिला नव्हतें. गुजरातींत जें चालू राहिलें तेंच पुढे डांगींतहि राहावयास हरकत नव्हती. पण स्थिति अशी आहे की, डांगीने उपरिनिर्दिष्ट सर्वनामांच्या बाबतींत सुद्धा नामांचा सामान्य षष्ठीचा प्रत्यय 'ना' हा उचलला. या घटनेचा खुलासा असा होतो की मराठीने या भागांत गुजरातीचा षष्ठीचा प्रत्यय जो घेतला तो सरसकट सर्वनामांनाहि लावला, व आपलें मूळ रूप राखूनहि मराठी पुरुषवाचक सर्वनामांनी गुजराती नामांचाच ना प्रत्यय घेतला—गुजराती सर्व नामांचा ' रो ' घेतला नाही, कारण त्यांत भिन्नता होती.

( २ ) आख्यात—प्रत्ययांच्या बाबतींत तर गुजरातीला एवढाहि अधिकार डांगीवर सांगतां येणार नाही. प्रस्तुत डांगी उतारा भूतकालीन घटनेचें वर्णन करीत असल्याने त्यांत वर्तमानकालीं व भविष्यकालीं रूपें फार कमी आलीं आहेत. भूतकालीं रूपेंच फार आहेत. भूतकालीन रूपांत तीन प्रकार आहेत. एकांत पडा, गया, लागा, ऐका, सांगा, मोडा अशीं पडला, गेला, लागला, ऐकलें, मोडली अशा अर्थांचीं रूपें आहेत. हीं रूपें हिंदी वा राजस्थानीचीं आहेत, गुजरातीचीं नाहीत. याबाबत कोणास अधिकार सांगतां येण्यासारखा असेल तर तो गुजरातीस नाही. दुसऱ्या प्रकारचीं रूपें 'ना'युक्त आहेत. उदा. लगना-लगणा ( लागला ), रहीना ( राहिला ), आनी ( आली ), वना ( आला ) आना ( आला ), भरना ( भरला ) इ० गुजराती उताऱ्यांतून भूतकालीं रूपें ' ना ' युक्त मुळींच नाहीं. ' ना ' हा मराठी ' ला ' आहे. ल उच्चारतां न आल्यानं न चा ल उच्चार करण्याची पद्धति लांगल-नांगर इत्यादि शब्दांतहि दिसून येते. ज्या खानदेशी-बरोबर डांगी ही जवळ जवळ एकरूप आहे असें ग्रिअर्सन् म्हणतो, त्या खानदेशी-मधील एका उताऱ्यांत तारलेला ऐवजी तारनेना असें रूप दिसतें. त्यांत ल ऐवजी न कसा उच्चारला जातो तें स्पष्ट दिसतें. आपली ( नी ) या सर्वनाम रूपांतहि हें याच उताऱ्यांत झालेलें दिसतें. तेथे गुजराती नी हा षष्ठीचा प्रत्यय नसून ली चाच नी हा उच्चार झाला आहे हें उघड आहे, कारण गुजरातीमध्ये नो हा प्रत्यय आपण या सर्वनामाचा

षष्ठीचा प्रत्यय असून लिंगवचनभेदाप्रमाणे तो बदलत नाही, निदान हीं 'ना' युक्त भूतकाळीं रूपें गुजरातीचीं नाहीत एवढे तरी स्पष्ट आहे. कारण गुजरातींत भूतकाळीं रूपें सर्वत्र 'यु' कारान्त आहेत. या 'यु' चा डांगी रूपांत कोठेच पत्ता नाही. डांगींचा ना हा खरोखर मराठीचा ला असतांना ग्रिअर्सनने खानदेशींत व म्हणून डांगींतहि 'ला' नाही असें म्हटलें आहे, व याचा संबंध द्राविडी किंवा मुंड भाषांशीं लावला आहे. तो मराठी नसून या आताच निर्देशिलेल्या भाषांतून आला असला तरी गुजरातीला त्यावर हक्क सांगतां येणार नाही हें स्पष्ट आहे. भूतकाळीं तिसरा प्रकार जो आहे तो गयेल (गेला), सांगेल ( सांगितलें ), दवडेल ( हरवला ) या रूपांचा. या रूपांत तर 'ल' कार अपभ्रष्ट रूपांत का होईना, पण अस्तित्वांत आहेहि.

हें भूतकाळाविषयी झालें. वर्तमानकाळीं मिळतीस ( मिळतात ) व मरस ( मरतो ) अशीं मुख्य क्रियापदांचीं दोनच रूपें या उताऱ्यांत सापडतात. यांचेंहि गुजरातीशीं साम्य नाही. गुजरातींत वर्तमानकाळ छ, छे या सहाय क्रियापदरूपांनी व्यक्त केला गेला आहे. या 'छ-छे' चा तर डांगीमध्ये कोठेच पत्ता नाही. भविष्यकाळीं रूपेंहि जाईन व म्हणसु अशीं दोनच आलीं आहेत. त्यांत पहिलें मराठीच आहे व दुसऱ्यांत प्रत्यय गुजराती असला तरी मुख्य शब्द केवळ मराठी आहे. आज्ञार्थी रूपें राख, दे अशीं डांगींत आहेत तीं मराठी आहेत. गुजराती उताऱ्यांतून हीं रूपें ओकारान्त आहेत. करूं हें आज्ञार्थ रूपहि गुजरातींत एकारान्त किंवा ओकारान्त आढळलें. मराठीमध्ये 'वा' कृदन्तास स, ला असे प्रत्यय लागून पुढे त्याचीं जायला, करायला अशीं ला-कारान्त रूपें होतात. तशींच तीं डांगीमध्ये चारुला ( चारायला ), म्हणुला ( म्हणायला ), खावाला ( खायला ), समजावाले ( समजावायला ) अशीं ला-कारान्त रूपें आहेत. हीं रूपें गुजरातीच्या उताऱ्यांतून नाहीत. बहुधा भूतकाळीं रूपांचा उपयोग केला आहे व क्वचित 'नु' कारान्त रूप आहे. ऊन कृदंतांचीं रूपें डांगीमध्ये विशेष प्रकारानें आलीं आहेत. करीसनी–करून, जाईसनी-जाऊन, येईसनी अशी 'सनी' कारांत आहेत. हा 'सनी' प्रत्यय नागपूरकडील भंडाऱ्याच्या मराठी बोलींत आहे आणि 'शानी' या रूपांत आपल्याकडील कुणबाऊ बोलींत आहे. गुजराती रूपांत हा स मुळीच नाही व नी ऐवजी ने आहे. आख्यात-प्रक्रियेच्या या विचाराचा निष्कर्ष असा निघतो की, गुजरातीपेक्षा मराठीच प्रत्यय–प्रक्रिया तीमध्ये अधिक प्रमाणांत पाळली आहे व जेथे ती पाळली नाही तेथे ती बहुतेक ठिकाणीं प्रमाण मराठी नसली तरी गुजराती तरी नाही. म्हणून गुजरातीला या बाबतींतहि डांगीवर हक्क सांगतां येणार नाही.

( ३ ) गुजरातीस सर्वांत अनुकूल भाग म्हणजे, सामान्यरूप हा जो एक मराठीचा विशेष मानला जातो तें सामान्यरूप डांगीमध्ये नामरूपांमध्ये नाही. पण या बाबतींत राजस्थानी अथवा हिंदी भाषांचाहि तोच प्रकार आहे, व सामान्यरूप डांगी वा खानदेशी या बोलींत नाही या मुद्यावर हिंदी वा राजस्थानी या भाषांना त्यांच्यावर आपला हक्क सांगतां येईल. पण येथेहि मराठीस अनुकूल असा एक भाग आहे. सामान्यरूप नामरूपांत न आढळलें तरी तें डांगी-खानदेशी या बोलींतून सर्वनामांतून आढळून येतें. पुढील रूपें पाहावीं– त्याहून, त्यासला, त्याला, त्यापासन, त्या, त्यलि, त्याने, त्यानी, त्यासाठी, माला, माले हीं सार्वनामिक रूपें सामान्यरूप घेऊन झालेलीं आहेत. सर्वनामें आपला स्वभाव लौकर सोडीत नाहीत हें आपण आधीच पाहिलें आहे व आपल्यास जेस्पर्सनने तसेंच सांगितलें आहे. म्हणजे अर्थ असा की, डांगी-खानदेशीने नामरूपांत जरी सामान्य रूप सोडलें असलें

तरी सर्वनामांत तें आढळतें. तेव्हा मूळांत तें तेथे असलें पाहिजे. कांही नामरूपांतहि हे अवशेष आढळतात. उदा. गोहाला ( मूळ शब्द गोहो आहे हें गोहोपान, गोझेनी या रूपावरून दिसतें )—मजुरकरासारखा, इत्यादि रूपांत ते आहेत. मूळ रूप व प्रत्यय यांमध्ये स घालून सामान्यरूप करण्याचा प्रकार बाँसला, सेजासबरोबर, गोहोसले या शब्दांत दिसतो. हा विशेष मराठी भाषेच्या कायोडी बोलीमध्ये दिसतो. गुजरातीच्या नमुन्यांत कोठे नाही. तात्पर्य, नामरूपांत डांगी-खानदेशींनी सामान्यरूप सोडलें. पण मराठीचा विशेष म्हटलें जाणारें हें रूप सर्वनामरूपांत व क्वचित् नामरूपांतहि शिल्लक आहे. सामान्यरूप सोडण्याची प्रवृत्ति आजहि प्रमाण मराठीमध्ये चालू आहे, हें मराठी भाषेकडे सूक्ष्मपणें लक्ष देणाऱ्यांच्या अवलोकनांत आलेलें असेलच. राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा जो अभ्यास मराठी भाषकांकडून चालला आहे त्याचा तो परिणाम असावा. निदान एवढें तरी म्हणतां येईल की, गुजरातीला सामान्यरूपाच्या अभावामुळे डांगी खान-देशीवर अधिकार सांगावयाचा असेल तर या प्रांतीच्या निम्म्या वाट्यावर हिंदी राजस्थानी या बोलीचाही हक्क आहे.

( ४ ) भाषेचें मूळ कार्य अर्थवाहन होय, व या दृष्टीने प्रत्यय—प्रक्रियांच्यापेक्षां शब्द-संग्रहाला अधिक महत्त्व द्यावें लागेल. प्रस्तुत डांगी उताऱ्यांत एकंदर ४०० शब्द आहेत. पुनरुक्त शब्द सोडल्यास भिन्न शब्दरूपांची संख्या २२५ आहे. या २२५ पैकी थोडीं (१) निखालस गुजराती, कांही अधिक (२) गुजराती व मराठी यांस साधारण असलेलीं, व इतर बहुसंख्य (३) गुजरातींत न सांपडणारीं आहेत. निखालस गुजराती शब्दरूपें म्हणजे मराठींतील ग्रिअर्सनने दिलेल्या कोणत्याहि बोलींत किंवा आजच्या प्रमाण मराठी मध्ये न सांपडणारीं अशीं रूपें. हीं रूपें दीधा, दीधी, लीधा, सुखेमनमाने इत्यादि ५–७ पेक्षा अधिक नाहीत. गुजराती व मराठी या दोनहि भाषांस साधारण असणारी अशीं रूपें थोडा, दीवस, सगळी, डुकर, काळ, नई ( नाही ), पण, जणला, पाप, सुद ( शुद्ध ) इत्यादि १५ ते २० पेक्षा अधिक नाहीत. इतर रूपांत कांही मराठी बोलींतून आढळणारीं आणि कांही मराठी मूळांस 'मा' वा 'ना' विभक्तिप्रत्यय लागून झालेलीं रूपें आहेत. केवळ विभक्तिप्रत्यय लागल्याने तीं रूपें गुजराती होऊं शकत नाहीत, व तशीं तीं गुजराती बोलींतून आढळत नाहीतहि. सारांश, २२५ शब्दरूपांपैकी ओढून-ताणून २५ शब्दरूपें गुजरातीची आहेत असें म्हणतां आलें तरी गुजराती व इतर यांचें प्रमाण १३ स ८७-असें पडतें. तेव्हा विभक्तिप्रत्ययांच्या जोरावर गुजरातीस डांगी—खान-देशीवर अधिकार सांगतां येणार नाही. प्रस्तुत उताऱ्यांतील अर्थवाहक शब्द पाहिले तरी मराठीचाच भरणा त्यांत फार आहे. गोहो, भाऊ, बाँस, पोँसा हे नात्यांचे शब्द गुजराती नव्हेत, मराठी आहेत. पाय, हात, गळा, पोट ( पोटभर ) हे अवयवांचे शब्द बहुतांशीं मराठी रूपांतच आले आहेत. वाटा, उधळपणा, मोलकरी, जेवनावळ, पायतन, मुदी, कळवांती, खेत इत्यादि अर्थवाहक शब्द शुद्ध मराठी आहेत. सारांश, अर्थवाहकतेच्या दृष्टीने प्रस्तुत डांगी उताऱ्यांत मराठीनेच बहुतेक सर्व धुरा उचलली आहे, यांत वरवर पाहणारालाहि शंका उरूं नये.

( ५ ) शेवटला मुद्दा उच्चारणाचा. गुजरातीमधील पुष्कळ रूपें ओकारान्त असतात हें त्या भाषेचा ओझरता परिचय असणाऱ्या माणसासहि जाणवतें. 'सुरत—भडोच'च्या बोलीं-तील पुढील रूपें पाहावीं. पोयरो, आपी लाखो, नाह्लो, चाइलो, मोटो, पड्डो, मइलो,

मोकइलो, बोइलो, केवानो, दीठो, दोइडो, लावो, पेरावो, घालो, गइलो, पाछो, इत्यादि अनेक शब्दांत हें स्पष्ट दिसतें. डांगीला सुरत-भडोचची बोली प्रादेशिकदृष्ट्या जवळ असतां या दोहोंच्या उच्चारणांत असलेला हा फरक डांगीचा गुजरातीशीं अन्वय जोडूं देत नाही. ग्रिअर्सनने दिलेल्या डांगी उताऱ्यांत 'तो' या सर्वनामरूपांशिवाय एकहि शब्दरूप ओकारान्त नाही, ही गोष्ट खास अर्थपूर्ण म्हणावी लागते. उच्चारणाबाबत गुजरातीस प्रतिकूल अशी आणखी एक गोष्ट डांगीमध्ये दिसते. तीमधील बाँस शब्दांतील ऑचा उच्चार इंग्रजी all च्या उच्चारासारखा करण्याची प्रवृत्ति आहे असें ग्रिअर्सनच सांगतो. कॉई, पोँसा हे उच्चारहि प्रस्तुत उताऱ्यांत आले आहेत. पळणें या अर्थी पॉळ असा उच्चार होतो हेंहि त्यानेच सांगून ठेवले आहे. हे उच्चार गुजरातीस येत नाहीत ही गोष्ट प्रसिद्ध आहे. मराठीच्या कुणबाऊ बोलींत प्याट, प्वांर, ग्वाड, त्वांड अशीं शब्दरूपें आहेत हेंहि प्रसिद्ध आहे. तेव्हा हा उच्चार गुजराती नसून मराठी आहे हें उघड आहे. ग्रिअर्सनच्या व्यक्तिनामांतील जॉर्जचा उच्चारसुद्धा गुजराती ज्योर्ज् असा करतात.

याबाबतींत ग्रियर्सनचें खाली दिलेलें म्हणणें लक्षांत घ्यावें:—

The phonetical system is on the whole, the same as in| Marathi and Gujarati. *Where these two languages differ, it sometimes agrees with the latter, but in most cases with the former* (मराठी). ( Page 204, vol.IX, Part III.)

त्याचप्रमाणे छे या सहाय-क्रियापद रूपाची गोष्ट. डांगीच्या उताऱ्यांत 'छे' हें रूप एकदाहि आलेलें नाही, 'से' हें रूप एकदाच आलें आहे व तें चित्पावनीमध्ये आढळतें. 'छे' हें रूप येण्याचे प्रसंग अनेक आहेत हें याच गोष्टीचे गुजराती तर्जुमे पाहिले की स्पष्ट दिसतें. 'सुरत-भडोच'च्या बोलींतून आलेलीं मळे छे, मुकें-छे, मरूँ-छुँ, कइरो-छे, हुँ-छे, आली-छे, आइवो-छे, रहे-छे, जडो-छे, इत्यादि रूपें याची साक्ष देतात. किंबहुना हा छे नसेल तर तो उतारा गुजराथी नव्हे असें म्हणावयास हरकत नसावी. आपलें 'छे' हें सहाय क्रियापदरूप सोडून देण्यास गुजरातीस विशेष कारण दिसत नाही. सामान्यतः सहाय क्रियापदांचीं रूपेंहि एक सोडून देऊन परकीय रूपें घेत नाहीं असें जेस्पर्सनूनेहि सांगितलें आहे.

येथवर केलेल्या विवेचनावरून डांगी-खानदेशी बोलीस गुजरातीचा आधार नसून मराठीचाच आहे ही गोष्ट भरपूर पुराव्यावरून सिद्ध झाली आहे, असें म्हणतां येईल. ग्रिअर्सन ज्या मराठीच्या आक्रमणाचा अनेकवार उल्लेख करतो त्याबाबत वस्तुस्थिति उलट समजावी लागते. मूळ मराठी आधारावर चालणाऱ्या भाषेवर गुजरातीचें आक्रमण होऊन षष्ठी-सप्तमीचे प्रत्यय आले व सामान्यरूप गळलें. ही भूमिका घेतल्यास डांगीमधील अनेक रूपांचा उलगडा होऊन जेस्पर्सनने दिलेल्या नियमांस धरून सारें प्रतिपादन सरळ होऊं शकतें. गुजरातीचा मूळ आधार धरल्याने तें होऊं शकत नाही. ग्रिअर्सनने most suffixes ( बहुतेक प्रत्यय ) गुजराती असल्याचें जें विधान केलें आहे तें खानदेशच्या उत्तरेकडील भिल्ली बोलींसंबंधाने खरें असेल कदाचित्, परंतु डांगी व खानदेशी या भाषांसंबंधी खरें नाही हें वर येऊन गेलेलेंच आहे. बाकीच्या Inner form चा ( अंतरंगाचा ) जो उल्लेख ग्रिअर्सनने केला आहे त्या बाबतींतहि हेंच म्हणावें लागेल. कारण प्रत्यय-प्रक्रिया, शब्दसंग्रह, उच्चारविशेष, शब्दयोगी, उभयान्वयी हीं अव्ययें व सर्वनाम-

रूपें या इतक्या तपशीलांत मराठीचा भाग किती भरभक्कम आहे हें स्पष्ट झाल्यावर आणखी Inner form तो काय उरला ? खानदेशी भाषा ही तेथील बहुसंख्य म्हणजे भिल्ल लोक बोलतात म्हणून अजमीरपासून खालच्या पट्टीमधील बोलींच्या बरोबरच तिची गणना करण्यांत ग्रिअर्सनने अशास्त्रीयता पत्करली आहे. 'भाषिक पाहणी' मध्ये भाषावार विचार करण्याचें सोडून तो विचार भिल्लांच्या समाजास धरून करण्यांत सामाजिक अधिष्ठान स्वीकारलें व भाषिक अधिष्ठान सोडलें असा अर्थ होतो.

खरोखर या भिल्ल प्रदेशांतील बोली कांहीं गुजरातीच्या, कांहीं राजस्थानीच्या व कांहीं मराठीच्या अशी विभागणी व्हावयास हवी होती. कारण यांतून या तीन भाषांच्या प्रत्ययप्रक्रिया दिसून येतात. खानदेशीचा तर एकीकडे गुजराती व दुसरीकडे हिंदी राजस्थानीशीं संबंध येतो. भिल्लांची भाषा या सर्वांपेक्षा कांहीं वेगळी होती असें गृहीत धरून भाषिक पाहणीमध्ये हा सामाजिक विचार घुसविण्यांत आला. महीकांठा विभागांतील बोलींत शेकडा ८४ शब्द संस्कृतनिष्ठ व शेकडा दहा पर्शियनमूलक आहेत, व उरलेल्या शेकडा सहा शब्दांचा पत्ता लागत नाहीं असें रे. थॉम्प्सन् यांचें मत ग्रिअर्सन यांनीच उद्धृत केलें आहे. भाषेतील शेकडा सहा शब्दांच्याखातर भिल्ली भाषा, कदाचित् पूर्वी स्वतंत्र असल्या तरी, आता स्वतंत्र मानण्याचें कारण नव्हतें. पण तसें केल्याने व खानदेशांत, भिल्ल वसति बरीच असल्याने, ते बोलत असलेली आजची भाषा ही मराठी नसून भिल्ली मानण्याचा, व भिल्लांची बरीच वसति खानदेशच्या उत्तरेस राजस्थानी व गुजराती यांच्या चिमटयांत असल्याने साहजिकच ते बोलत असलेल्या गुजरातीशीं वा राजस्थानीशीं त्या बोलींचा संबंध लावण्याचा प्रसंग आला. यांतूनच प्रस्तुत वादास कारण मिळालें. सामाजिक अधिष्ठान सोडून भाषिक अधिष्ठान स्वीकारल्यास मराठीचा खानदेशीस असलेला आधार स्पष्ट होतो व तिच्या आक्रमणाची भाषा बोलावी लागत नाही. दोन भाषांचा संबंध आला की देवाणघेवाण ही व्हावयाचीच. तशी देवाणघेवाण मराठीने एकीकडे गुजरातीशीं व दुसरीकडे राजस्थानीशीं केली असली, तरी खानदेशी भाषेचें मूळ खोड ( Stock ) मराठीचेंच आहे यांत शंका नाही. तिचा आधार मराठी नसून गुजराती आहे हें ग्रिअर्सनने सांगण्यापूर्वी तिचा संबंध मराठीकडे लावण्यांत येई हें त्यानेच सांगितलें आहे. तीच समजूत बरोबर होती असें पुनः एकदा म्हणण्याचा प्रसंग आणि संधि आज येत आहे.

## विवेचनाचा निष्कर्ष

वरील विवेचनांतून निघणारे निष्कर्ष असे आहेत :—

(१) ग्रिअर्सनने दिलेल्या डांगी बोलीच्या उताऱ्यांत गुजराती व राजस्थानी यांचे कांही प्रत्यय दिसत असले तरी तिचा मूळ आधार मराठीचाच आहे.

(२) परकीय भाषांचा परिणाम व भाषांमधील शब्दऋण यांच्या संदर्भात प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ जेस्पर्सन याने कांही स्थूल सिद्धान्त मांडिले आहेत. त्यांच्या अनुरोधाने डांगी भाषेचें परीक्षण केल्यास तिचा आधार मराठीच आहे हें निश्चित करतां येतें. उभयान्वयी अव्ययें, संख्यावाचक शब्द, शब्दयोगी अव्ययें, पुरुषवाचक सर्वनामरूपें, दर्शकसर्वनामरूपें, सहायक्रियापदें हे शब्दप्रकार कोणतीहि भाषा सहसा आपले सोडून परकीय भाषेतून घेत नाही असें जेस्पर्सनचें म्हणणें आहे. या शब्दप्रकारांच्याबाबत डांगीचें परीक्षण केल्यास मराठीच्याच बाजूने निर्णय लागतो.

(४) विभक्तिप्रत्ययांत षष्ठी व सप्तमी यांचे प्रत्यय डांगीमध्ये गुजरातीमधून घेतले असले तरी पंचमी, चतुर्थी, ( म्हणून द्वितीया ), आणखी तृतीया यांचे विभक्तिप्रत्यय मराठी आहेत.

(५) क्रियापदप्रत्ययांपैकी वर्तमानकाल आणि भूतकाल यांचे प्रत्यय गुजराती नाहीत व मराठीशीं संबंद्ध आहेत. भाविष्यकाळीं प्रत्ययाबाबतहि ग्रिअर्सनने दिलेल्या डांगीच्या उताऱ्यांत तरी गुजरातीस अंशतःच आधार मिळतो. मराठीस अधिक मिळतो. इतर कृदन्त-रूपांतहि गुजरातीस आधार नाही. म्हणून डांगीची प्रत्ययप्रक्रियाहि मराठीसी अधिक अनुकूल आहे.

(६) शब्दसंग्रहाच्या दृष्टीने विचार केल्यास प्रस्तुत उताऱ्यांत गुजराती व गुजराती–मराठीस साधारण अशा शब्दरूपांचें आणि इतर शब्दरूपांचें प्रमाण १३:८७ असें पडतें. त्यांत केवळ गुजराती शब्द घेतले तर हें प्रमाण ५:९५ पेक्षा गुजरातीस अनुकूल पडणार नाही. म्हणून शब्दसंग्रहाच्या दृष्टीनेहि मराठीच आधारभूत म्हणावी लागते.

(७) गुजरातींत पुष्कळ प्रमाणांत आढळणारा, शब्दांच्या अंतींचा 'ओ' काराचा उच्चार डांगीच्या उताऱ्यांत मुळीच नाही. उलट गुजरातीस अशक्य वाटणारा इंग्रजी all मधील 'ऑ' चा उच्चार डांगीमध्ये आहे. म्हणून उच्चारणाबाबतहि डांगी ही गुजरातीची बोली नसून मराठीची आहे.

(८) 'छे' हें सहाय क्रियापद म्हणजे गुजरातीची अचूक निशाणी आहे. हा शब्द पुनः पुनः यावा असे प्रसंग प्रस्तुत डांगी उताऱ्यांत अनेक असूनहि तो एकदाहि डांगी तर्जुम्यांत आलेला नाही ( गुजराती तर्जुम्यांतून अनेक वेळा आला आहे. )

(९) सारांश, उच्चारण, शब्दसंग्रह, प्रत्ययप्रक्रिया आणि विनिमयास प्रतिकूल असणारे शब्दप्रकार या सर्वांची साक्ष गुजरातीस बव्हंशीं प्रतिकूल आणि मराठीस बव्हंशीं अनुकूल अशी पडते. मुंबई सरकारने या बाबतींत घेतलेला निर्णय भाषाशास्त्रदृष्ट्या शास्त्रपूत आहे याविषयीं शंका नाही.

गुजराती विद्वानांनी आता असें करावें. जेस्पर्सन या प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञाचीं मतें चुकीचीं आहेत असें सांगावयास लागावें. तें न जुळल्यास ग्रिअर्सनने त्याच्या मतास अनुकूल असे जे कबुलीजबाब देऊन ठेवले आहेत, ते चुकीचे आहेत असें म्हणावयास प्रारंभ करावा. हेंहि न जुळल्यास ग्रिअर्सनने दिलेला डांगीचा उताराच मुळांत चुकीचा दिला आहे असें प्रतिपादन सुरू करावें. यापैकी कांहीच न जुळल्यास आपल्या हेतूच्या सिध्द्यर्थ भाषिक आधार न घेतां इतर आधार शोधण्यास लागावें.

---

मुद्रकः— लक्ष्मण नारायण चापेकर, 'आर्यसंस्कृति मुद्रणालय,'
१९८/१७, सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.
प्रकाशकः— वा. दा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्,
टिळक रस्ता, पुणें २.

मुद्रकः— लक्ष्मण नारायण चापेकर, 'आर्यसंस्कृति मुद्रणालय,' १९८/१७, सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.

प्रकाशकः— वा. दा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्,